


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




## श्रेयनामावलि—



● **पं. जवाहरलाल नेहरू** – शेवटीं विजय आपलाच आहे. ● **यशवंतराव चव्हाण** – हिमालयाची हांक ● **जयवंत दळवी** – जत्रेंतील पात्रें, – शांत्याची बत्तिशी आणि गोमूत्र ● **श्रीपाद काळे** – देणाऱ्यानें देत रहावें— ● **ग. दि. माडगूळकर** – लढा वीर हों लढा ● **आत्माराम निळकंठ** – त्या दुष्कर्मांच्या पश्चात्तापानें मी जळत आहे ● **शकुंतला बोरगांवकर** – डॅडी–ममीची जोडी ● **गोपालकृष्ण भोबे** – महारुद्रा तृतीय नेत्र उघडा. ● **कै. भास्करराव तांबे** – रुद्रास आवाहन ● **'मराठा'** – अरे अरे चाऊ.

सदरें:—

● **युद्धस्यकथा** – वझिरस्थान, औरंगाबाद, मी पूल कसा घेतला ● दीपमाला–**सारस्वत** ● स्फूर्तीची फुलें—**दत्तात्रय सोमण, श्रीकृष्ण ठाकूर, बाळ.**

● **दानपूरगे** – माझें सत्व – **जयवंत गुजर.**

*संपादक-मुद्रक-प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ या प्रतीस किंमत रु. १ अधिक रजिस्टर पोष्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु १२॥. या अंकात प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. * या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

डिसेंबर १९६२ वर्ष १८ वें टेलिफोन ७७७६५



# महारुद्रा, तृतिय नेत्र उघडा !!!

हे देवेश्वर हिमनगजा-माता तुला नमस्कार असो. देवांच्या पालका, प्रकाशस्वरूप महादेवा तुला नमस्कार असो. सर्वभक्षक काळाचा स्वामी तूंच आहेस. सर्वव्यापि आकाश तुझा एक अवयव आहे; म्हणूनच तूं महा आहेस. केवळ तुझ्या दर्शनानें पाप–तापांचा नाश होतो. महारुद्रा, प्रलयकालांत शत्रूंचा संहार करणारा म्हणून तुला 'शर्व' म्हणतात. 'नमोऽस्तु शर्वाय नमःशिवाय' –अनादिकालापासून आमचे पूर्वज हा महामंत्र सांगत आले. कोटि कोटि कंठांनीं तो जपला. तुझ्या नांवाचा हा महामंत्र जपल्यानें 'कळिकाळाचें' भय नाहींसें होतें हें तूंच आपल्या भक्तांना सांगितलेंस.

परतु हे चराचर स्वरूपा, सत्य–न्याय–सदाचार या तुम्हींच शिकविलेल्या व्रतत्रय चें पालन करीत स्वात्मोध्दार साधण्यांत आम्हीं गर्क असतांना आणि अशा स्थितींत महाप्रलय

गोपालकृष्ण भोबे

पातला तरी सर्वतोपरी तूं आमचें रक्षण करण्यास समर्थ आहेस अशा संपूर्ण विश्वासानें आम्हीं कार्यमग्न असतांना आमची उत्तरसीमा रक्तलांछित व्हावी याला काय म्हणावें ?

अधीश्वरा, सुमेरु, विंध्याचल, मंदराचल, गंधमादन, चित्रकूट, माल्यवान, महेंद्र, सह्य, रैवत इत्यादी पर्वतराज सोडून तूं हिमालयावर वस्ति केलीस तुझें तें सासर म्हणून नव्हे–तर सर्व जगतांत मानाचें स्थान मिळविणाऱ्या त्याच्या उंच शिखरावरून कन्याकुमारीपर्यंत पसरलेल्या भारतावर आपली अमृतमय दृष्टि सदैव ठेवतां

यावी हा तुझा तिथेंच वास्तव्य करण्याचा हेतु असावा.

हे करुणामया, त्रिपुरासुर, दुर्गमासुर, हालाहल इत्यादि दैत्यांचा निःपात करून ही हिंदभू तूं संकटरहित केलीस आणि चिरकाल शांतिसाठीं नगाधिराजावर विराजमान झालास; पण महेशा–आतां जागृत हो. विरुपाक्षा, नुसते तू डोळे उघडलेस तरी येऊं घातलेल्या संकटाचा परिहार होईल. तुझा तृतीय नेत्र चराचरांतील महासंकटाचा नाश करण्याकरितांच तू उघडतोस. शेजाऱ्यांना मित्र म्हणण्याची सद्बुद्धि आम्हांला तूंच दिलीस; पण आम्ही निश्चितपणें खांद्यावर मान टाकलेल्या या मित्रांनींच आमचा विश्वासघात केला. अशा राक्षसी वृत्तीच्या लोकांना दंड करणारा म्हणून तुला 'चंड-दंड' असें म्हणतात. दुष्टांना दंडण करण्यासाठी तूं खट्वांग धारण केलेलें आहेस. परमेशा आतां तुझें शांत रूप सोड आणि उग्र असे विजयरूप धारण कर. ज्या भूमीवर तुझें वास्तव्य आहे, त्या भूमीला पराजय कधीं माहीत नाहीं. तुझ्या विश्वसंहारी त्रिशुळाचा एक आघात खंडच्या खंड छिन्नविछिन्न करून टाकील. केवळ तुझ्या तांडवानें ब्रह्मकल्पांत मांडतो. तिथें तुझा तृतीय नेत्र उघडण्याची आवश्यकताच काय. अत्यंत मायावी अशा हयासुराला तू सहज मारलेंस तिथें या अंगुष्ठमात्र मानवांचा काय पाड ? आमचें एवढेंच मागणें कीं तुझ्या वसतीस्थानाच्या पायथ्याशीं शुभ्र हिमावर तुझ्याच भक्ताच्या रक्ताचा सडा सांडावा आणि तूं स्वस्त असावेंस हें उचित नव्हे. रुद्रा जागा हो अमंगलांच्या पदस्पर्शानें तुझें स्थान भ्रष्ट होऊं देऊं नकोस. ते पतित होऊं नये म्हणून प्राणपणानें प्रतिकार करणाऱ्या तुझ्या भक्तांच्या रक्षणार्थ सहाय्यक हो ! त्यांच्यावर तुझा कृपाकटाक्ष असू दे.

हे भीमस्वरूपा तुझें आधिपत्य असलेल्या भरतभूवर अनेकांनी वांकडा डोळा करून पाहिलें, पण त्यांचे कधीं हि भलें झालें नाहीं. विश्वासघात करणाऱ्यांचा तर तूं समूळ नायनाट करतोस अशी तुझी ख्याति आहे. तुझ्याप्रमाणेंच आम्ही भोळे ! आम्हीहि दुष्टांवर विश्वास ठेवला. हे सदाशिवा, आम्हांला शक्ति दे, युक्ति दे, बुद्धि दे आणि या संकटापासून आमचें रक्षण कर. आमचें श्रेष्ठत्व आम्ही कुणावर लादलें नाहीं. आजपर्यंत सहजीवन जगायचाच प्रयत्न केला. भारतीय संस्कृतीनें शिकवलेलीं जीं तत्त्वें आहेत तीं आचरणांत आणण्यासाठीं आम्हीं जिवाचें रान केलें. आम्ही कुणावर सक्ति केली नाहीं. दुसऱ्याच्या धर्मावर कधीं दडपण आणलें नाहीं. दुसऱ्याच्या मालमत्तेवर कधीं हक्क सांगितला नाहीं. जें आमचें आहे त्याची जोपासना करून वर्धिष्णु वृत्तीच बाळगली. आणि सहिष्णु वृत्तीनें स्वातंत्र्याची जोपासना केली. असें असतांना आमच्या स्वातंत्र्यावर घाला घालून आमची प्रगति खच्ची करायला प्रवृत्त होणाऱ्या नरपशूंचा तुला राग कसा येत नाहीं !

हे रुद्रा, तुझा प्रलयंकारी प्रत्यय पाहण्याची हीच वेळ आहे. तुझ्या अस्तित्वाची प्रचिति दाखविण्याची हीच संधि आहे. अखिल भारतीयांची शरीरें, सूडाच्या, त्वेषाच्या भावनेनें आतां तापून उठलेलीं आहेत. अन्याय आम्हांला

## अरे अरे चाऊ !

अरे अरे चाऊ !
कालपर्यंत म्हणत होतास
"मी तुमचा भाऊ"
म्हणून पंचशीलाचा
तुला दिला खाऊ
पण तूं तर ठरलास
शूर्पणखेचा भाऊ
बऱ्या बोलानें परत जा
नाहीं तर इंगा दावूं
आक्रमणाच्या चटणीसंगं
तुला कच्चा खाऊं

—मराठा

आक्रमण !




आणि खंबीर प्रतिकार !



# रुद्रास आवाहन

(जाति वीरभद्र, राग शंकरा)

डुमडुमत डमरु ये, खण्खणत शूल ये
शंख फुंकीत ये, येई रुद्रा !
प्रलय घन भैरवा, करित कर्कश रवा
क्रूर विक्राळ घे क्रुद्ध मुद्रा ! ॥धृ०॥

कडकडा फोड नभ, उडव उडु मक्षिका,
खडवड व दिग्गजां, तुडव रवि मालिका,
मांड वादळ, उधळ गिरि जशी मृत्तिका
खवळवीं चहुंकडे या समुद्रां ! १

पाड सिंहासनें दुष्ट ही पालथीं
ओढ हत्तीवरुनि मत्त नृप खालतीं
मुकुट रंकास दे करटि भूपा प्रति
झाड खट्खट तुझें खड्ग क्षुद्रां ! २

जळ तडागीं सडे, बुडबुडे, तडतडे
'शांति ही !' बापुडे बडबडति जन किडे !
धडधडा फोड तट ! रुद्र, ये चहुंकडे,
धगधगित अग्निमाधें उजळ भद्रा ! ३

पूर्वि नरसिंह तूं प्रगटुनी फाडिले,
दुष्ट जयिं अन्य गृहिं दरवडे पाडिले,
बनुनि नृप, तापुनी चंड, जन नाडिले
दे जयांचें तयां वीर भद्रा ! ४

इंदूर, ता. ३-१२-१९२०] — कॅ. भास्करराव तांबे

सहन होत नाहीं. तुलाहि तो कधींहि सहन झालेला नाहीं. 'संभवामि युगे युगे' अशी ग्वाही कृष्णरूपानें तूं दिलीस. धारातीर्थी तप आचरणाऱ्या आमच्या रक्षणकर्त्यांच्या रोमारोमांत तुझ्या तेजानें प्रवेश करू दे. तुझ्या भूमीवरील शत्रूचा पदाघात समूळ उखडून टाक. नुसतें तुझें तेज फाकलें तरी दुष्ट लोक त्या अग्निसदृश्य प्रखर तेजानें जळून जातील. महादेवा, आतां अंत पाहूं नकोस. सतीचा अपमान झाला तेव्हां दक्षासारख्या बलाढ्याचा विध्वंस करून तूं आपलें प्रचंड सामर्थ्य प्रगट केलेस असें पुराणें सांगतात, पण आज तुझें माहेर भ्रष्ट होऊं पहात आहे. तू नुसतें अंग घुसळलेस तर हजारों वीरभद्र उत्पन्न होऊन शत्रूंना विध्वंस करतील. तेव्हां हे विश्वनाथा, आपलें तेज प्रगट कर आणि अनादिकालापासून भारतीय ऋषिमुनींनी गर्जून सांगितलेल्या तुझ्या शक्तीची प्रचीति दाखव ! हवाच असेल तर उघड तुझा तृतीय नेत्र आणि जाळून टाक अधमाला !!

•••



**नाहींतर तिनें आपली खूप मुलें युद्धासाठीं दिली असती.**

अमेरिकेंत युद्ध चालू असतांनाची गोष्ट. एक वृद्धा पत्रकारांना सांगत होती –" माझी दोन्ही मुलं मीं युद्धावर पाठवूं शकलें म्हणून मला किती किती बरं वाटतंय्. परमेश्वराची कृपा म्हणून हे जमलं." पण तरीही तिला दुःख होत होतं ते एकाच गोष्टीचं. ती ही कीं, युद्ध सुरू होणार आहे हें तिला वीस वर्षांपूर्वी माहिती नव्हती. नाहींतर...नाहींतर...तिनें खूप मुलं युद्धासाठीं दिली असती.

•••

अनुक्रमणिका



# संकटाला खंबीरपणें तोंड दिलेंच पाहिजे

# शेवटीं विजय आपलाच आहे

एकनेव आशारयान

मी बऱ्याच दिवसांनंतर आपल्याशीं बोलत आहे. चिनी सैनिकांनीं आपल्या सरहद्दीवर बेमुर्वतखोरपणें आक्रमण केलें असल्यामुळे आपल्या सरहद्दीवर गंभीर परिस्थिति निर्माण झाली आहे. आणि त्याच संबधांत मला आपल्याशीं बोलावें लागत आहे. या गंभीर परिस्थितीला सर्वांनीं परिणामकारकरीत्या तोंड देण्याची आवश्यकता आहे. या देशांतील सर्व स्त्रीपुरुष शांततावादी आहेत व त्यांना शांततेच्या मार्गांनीं काम करण्याची संवय जडली आहे.

## चीननें विश्वासघात केला

आम्हाला युद्धाची कधींच गरज भासली नाहीं. आणि यामुळेंच पांच वर्षांपूर्वीं लडाखमधील आपल्या प्रदेशांत आक्रमण करण्यांत आलें तरी आम्हीं या आक्रमणाचा प्रश्न शांततेच्या धोरणानेंच मिटविण्याचा प्रयत्न केला. आम्ही हा प्रश्न शांततेनें मिटविण्यासाठीं सन्माननीय मार्ग शोधून काढला. आणि हेंच आमचें धोरण आम्ही सर्व जगभर अंमलांत आणीत असून तेंच आम्ही आपल्या देशांतहि लागू करीत आहो. आजच्या युगांत युद्धाचे कोण-कोणते दुष्परिणाम होतात याची आम्हांला पूर्ण जाणीव आहे व त्यामुळेंच युद्धाची झळ जगाला पोहोचूं नये म्हणून आम्ही युद्ध न होऊं देण्याची पराकाष्ठा करीत होतो. आमच्या सरहद्दीचा प्रश्न शांततेच्या मार्गानें सोडविण्याचे आमचे सर्व प्रयत्न व्यर्थ ठरले. परंतु चीनसारख्या बलाढ्य व अविवेकी राष्ट्रानें, शांततेची किंवा शांततेच्या मार्गाची तमा न बाळगता, आम्हांला वारंवार धमक्या दिल्या व या धमक्या त्यानें आमच्यावर आक्रमण करून प्रत्यक्ष कृतींत उतरविल्या. यामुळें आपल्या देशाच्या व लोकांच्या स्वातंत्र्याला धोका निर्माण झाला असून या क्षणीं आपण या संकटाची गंभीरपणें दखल घेतली पाहिजे.



अनुक्रमणिका

मी हें बोलत असतानांदेखील, मला आपणाला असें सांगितलें पाहिजे कीं, आपण अनेक शतकांचें परकीय वर्चस्व नष्ट करून अतिशय त्यागानें व कष्टानें आपलें स्वातंत्र्य मिळविलें आहे आणि त्यामुळें जगांतील कोणत हि शक्ति तें हिरावून घेऊं शकत नाहीं. तेव्हां, आपलें स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं व आपल्या देशाची अभेद्यता राखण्यासाठी आपण एकजूट केली पाहिजे व स्वतंत्र भारतापुढें जें मोठें संकट उभें राहिलें आहे त्याला तोंड दिलें पाहिजे. या संकटास प्रभावीपणें तोंड देण्याच्या कार्यांत आपण यशस्वी होऊं याबद्दल मला शंका नाहीं. मातृभूमीच्या व लोकांच्या स्वातंत्र्याहून कोणतीही गोष्ट अधिक मोलाची नाहीं. यासाठीं सर्वस्वाचें बलिदान करण्याची आवश्यकता भासली तर तीहि आम्ही करूं.

गेल्या पांच वर्षांपासून चीननें कसकसें आक्रमण केलें आहे यासंबंधींचा प्रदीर्घ इतिहास सांगण्याची माझी इच्छा नाहीं. परंतु चीननें या आक्रमणाचें समर्थन वारंवार खोटीनाटीं विधानें करून व आमच्या देशाविरुद्ध अपप्रचार व खोटे आरोप करून केलें आहे.

### उपकाराची परतफेड अपकारानें

जगाच्या इतिहासांत भारतासारखीं उदाहरणें क्वचितच सांपडतील. भारतासारख्या एखाद्या देशानें रूढ चाकोरीबाहेर जाऊन, चीन सरकारला व चिनी लोकांना मदत करण्याचा, त्यांची मैत्री संपादन करण्याचा व त्यांची बाजू जगासमोर मांडण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु आमच्या या वागण्याची परतफेड त्यानें आमच्यावर आक्रमण करून व आमच्या पवित्र मायभूमीवर हल्ला करून केली आहे. कोणतेंहि स्वाभिमानी राष्ट्र—विशेषतः भारतासारखें स्वातंत्र्यप्रेमी राष्ट्र या आक्रमणापुढें मान नमवूं शकत नाहीं. मग त्याचे परिणाम काय वाटेल ते होवोत. गेल्या पाच वर्षांपासून लडाखच्या सरहद्दीवर सतत आक्रमण करण्यांत येत आहे. आमची नेफा प्रदेशांतील ब्रह्मदेशाशी सीमा या आक्रमणापासून मुक्त होती. दोन्ही भागांत निर्माण झालेलें तंग वातावरण कमी कसें करावें याबाबत चर्चा करण्यासाठीं व दोन्हीं देशांतील प्रतिनिधींना एकत्र येऊन विचार करण्यास वाव असतांना चीननें नेफा सरहद्दीवर अचानक नवें आक्रमण केलें. ता. ७ सप्टेंबर रोजीं या आक्रमणास सुरुवात झाली. तंग वातावरण नाहीसें करण्याचा हा खरोखरच विचित्र असा प्रकार आहे. चिनी सरकारचा आमच्याशीं वागण्याचा हा आगळाच प्रकार आहे. नेफा प्रदेशांतील आमची चीनबरोबर असलेली सरहद्द सर्वांना माहीत असून अनेक वर्षांपासून ती निश्चित ठरलेली आहे. या सरहद्दीला मॅकमोहन रेषा म्हणून संबोधण्यात येतें. ह्या रेषेनें भारत व तिबेट अलग केले आहेत. ही रेषा, इतिहास, परंपरा व करारमदार यांनी निश्चित झाली आहे. मॅकमोहन रेषा ही बेकायदेशीर असल्याचें चीन म्हणत असला तरी चीनने या रेषेला अनेक प्रकारे मान्यता दिली आहे. नेफा प्रदेशातील जो भाग अनेक वर्षांपासून आमच्या शासनाखालीं आहे तो भाग चीनने आपल्या नकाशात दाखविला आहे. सध्याची चीनची राजवट १२ वर्षांपूर्वी अस्तित्वात आली. त्यापूर्वी तिबेटनें या रेषेला कधीही हरकत घेतली नाही. चीननें तयार केलेले नकाशे हे जुने पुराणे असून सध्याच्या वस्तुस्थितीशी ते विसंगत आहेत असें तिबेटनें वारंवार सांगितलें.

### चीनची आगाऊ तयारी

भारताच्या या सीमेवर दीर्घ काळापासून कोणताही उपद्रव पोहोचला नव्हता अथवा युद्धही झालें नव्हतें. अशा या भागांत

चिनी
नक्राश्रु!



बघा हो मला शांततावाद्याला हें काय करायला लावलें या भारतानें...



अनुक्रमणिका

चीननें आक्रमण केलें. ह्या आक्रमणासाठीं त्यांनी फार मोठें सैन्यबळ वापरलें असून जोराची चढाई करण्याच्या दृष्टीनें फार मोठी आगाऊ तयारीही केली होती.

या सरहद्दीवर लढतांना आपल्या सैनिकांना जी माघार घ्यावी लागली त्याबद्दल मला अत्यंत खेद होतो. आपल्या सैन्यावर चिनी सैनिकांनी फार मोठ्या संख्येनें चाल केली. इतकेंच नव्हें तर चिनी सैनिकांजवळ पहाडी तोफा व पल्लेदार बंदुका होत्या. आपल्या ज्या अधिकाऱ्यांनी व सैनिकांनी त्यांना धैर्यानें तोंड दिलें त्यांना मी धन्यवाद देतो. त्या भागांत आपल्या सैनिकांना आणखीहि कांहीं वेळ माघार घ्यावी लागेल परंतु एक गोष्ट मात्र निश्चित आहे व ती ही की अंतिम विजय आपलाच होईल. जेव्हां आपला देश आपल्या स्वातंत्र्याकरितां लढतो तेव्हां विजय त्याचाच असतो, हें निःसंशय! परंतु आपण एका बलाढ्य व निर्ढावलेल्या प्रतिस्पर्ध्याशीं लढत आहो, हें आपण विसरता कामा नये. म्हणून या परिस्थितिशीं आत्मविश्वासानें सामना देण्याकरितां आपल्याला आपली शक्ति मोठ्या प्रमाणावर वाढविली पाहिजे.

**लढा दीर्घकाळ पण यश आपलेंच**

हें युद्ध बराच काळपर्यंत चालेल. आपण त्याकरितां आपली जशी मानसिक तशीच इतर दृष्टींनीही तयारी केली पाहिजे. आपण आत्मविश्वास वाढविला पाहिजे आणि मला विश्वास वाटतो कीं, आपल्या आत्मविश्वासाला व आपल्याकडून होणाऱ्या शिकस्तीच्या प्रयत्नांना यश आल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणून आक्रमकांच्या हातून आपल्या देशाला वाचविण्यासाठीं आपण विश्वास व दृढनिश्चय करूं या.

**मनें पोलादी करा**

आपला देश चिनी आक्रमणापासून मुक्त करण्यासाठीं आपल्याला आपलीं मनें पोलादी केलीं पाहिजेत, आणि राष्ट्राची सारी शक्ति या एकाच कार्यासाठीं वेचली पाहिजे. शांततेच्या काळात आपल्या कामाचा जो वेग मंदावला होता तो पहिल्यापेक्षां अनेक पटींनीं वाढविला पाहिजे. यामुळें आपल्याला पाहिजे असणाऱ्या गोष्टी जलद करतां येतील. आपल्याजवळ असलेल्या सर्व साधनांचा उपयोग करून आपण आपलें संरक्षण-सामर्थ्य वाढविलें पाहिजे.

अशा वेळीं केवळ लष्करी-सामर्थ्य वाढवून चालणार नाहीं त्याला राष्ट्रांतील उद्योगधंद्यांची संपूर्ण जोड देऊन आणि हरेक मार्गाचा अवलंब करून, आपल्याला आवश्यक असणाऱ्या मालाचे उत्पादन वाढविले पाहिजे. कामगारांनीं संप करू नयेत किंवा कारखान्यांतील उत्पादन घटेल अशा कोणत्याही मार्गाचा अवलंब करूं नये अशी त्यांना माझी कळकळीची विनंती आहे. शेतमालाच्या उत्पादनाच्या बाबतींत हीच गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे.

राष्ट्रावर संकट आले असतांना राष्ट्रविरोधी आणि समाजविरोधी कृत्यें सहन केलीं जाणार नाहींत.

आपल्या सर्वांना फार मोठी जबाबदारी पार पाडावी लागणार आहे; मग आपण कोणत्याहि क्षेत्रांत काम करीत असा. स्वातंत्र्याचें संपूर्ण मोल आपल्याला दिलें पाहिजे. आपल्या मातृभूमीचें स्वातंत्र्य अबाधित राखण्यासाठीं आणि जनतेचें रक्षण करण्यासाठीं वाटेल ती किंमत द्यावी लागली तरी ती कमीच ठरणार आहे.

देशरक्षणाच्या या महान कार्यांत भारतातील सर्व पक्ष आणि गट आपापसांतील सर्व मतभेद विसरून जाऊन देशाच्या स्वातंत्र्याला आणि

## द्या, आणखी आणखी द्या !



द्या, आपल्या देशाच्या स्वातन्त्र्य रक्षणासाठीं कितीहि दिलेत तरी त कमीच—

एका अघोर शक्तीनें आपल्या शांतताप्रिय भारतावर युद्ध लादलें आहे. आमच्या युयुत्सू योद्ध्यांना आणि पुढाऱ्यांना शत्रूशीं मुकाबला करण्यासाठी तुमचं सक्रीय सहाय्य हवं. आपल्याला कदाचित् फार काळ थांबावं लागेल, संकटं येतील पण शेवटीं जय आपलाच हें निश्चित्.

पैसे मिळत आहेत हें खरं, पण तरीहि आणखी धन हवें, अन् तें त्वरित हवे. जें जें तुम्ही देऊं शकाल तें सारं द्या, कारण स्वातंत्र्य आणि तेही मातृभूमिचं स्वातंत्र्य हे सर्वांहून जास्त मौल्यवान आहे. तुम्ही फक्त द्या–आणि तेच देणें सत्कारणीं टरेल.

पंतप्रधान जवाहरलाल नेहरूंनीं सांगितलें 'समर भूमीवर लढणाऱ्या जवानासाठीं सरकार सर्व कांहीं करीत आहे खरें' पण आम जनतेचें सहकार्य हें जास्त महत्वाचें आहे. म्हणून मी तुम्हां सर्वांना आपल्या या स्वातंत्र्य रक्षणाच्या यज्ञांत सहभागी होण्यासाठीं आवाहन करीत आहे. हा झगडा आपल्यावर लादला गेला आहे म्हणून लोकहो–तुम्ही **नॅशनल डिफेन्स फंडाला** तन–धनानें मदत करा ! जास्तींत जास्त मदत करा ! !

**(दलाल आर्ट स्टुडिओ तर्फे भारतीय जनतेला आवाहन)**

एकतेला जो कोणी धोका निर्माण करील त्याच्याशी एकजुटीनें लढा दिल्याशिवाय राहणार नाहीं याविषयीं मला खात्री आणि विश्वास वाटतो.

### मोठी जबाबदारी

आपल्यावर पडणारी जबाबदारी मोठी आहे. उत्पादन कार्यासाठीं लागणारा पैसा पुरविण्यासाठीं आणि राष्ट्रीय संरक्षणाचा वाढता खर्च भरून काढण्याकरिता बचत योजनेंत मोठ्या प्रमाणावर पैसे गुंतविले पाहिजेत. भाववाढीला आपण आळा घातला पाहिजे, आणि राष्ट्र संकटात असतांना जे नफेबाजी करतील ते राष्ट्राचे शत्रू ठरतील व त्यांच्या या राष्ट्रविरोधी कृत्यामुळें राष्ट्राचें नुकसान झाल्याशिवाय राहणार नाहीं.

### तिसऱ्या योजनेंत थोडेसे फेरफार

आपण तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या मध्यात आहोंत. ही योजना सोडून देण्याचा किंवा त्यांतील कोणत्याहि मोठ्या कार्यक्रमांत कपात करण्याचा मुळीं प्रश्नच उद्‌भवत नाहीं. नव्या परिस्थितीनुसार त्यांत आम्हांला थोडे फेरफार करावे लागतील एवढेंच. योजनेमधील महत्त्वाच्या प्रकल्पांची अंमलबजावणी करावीच लागणार आहे आणि यादारचें आपण आपला देश सध्याच्या परिस्थितींतच नव्हे तर पुढील काळाच्या दृष्टीनेंहि सामर्थ्यवान करूं शकूं.

### एकजूट हेंच सामर्थ्य

अनेक चांगल्या गोष्टी करण्याची आपल्या लोकांत कुवत आहे. लोकांनीं अशा संकटाच्या काळांत काय केलें पाहिजे हें मी पुढें सांगेन परंतु सर्वांत मुख्य गोष्ट कोणती असेल तर स्वातंत्र्याच्या प्रश्नावर संपूर्ण राष्ट्रानें एकजुटीनें उभें राहून, स्वातंत्र्याचें रक्षण केलें पाहिजे. आम्ही कोणाचें वर्चस्व सहन करणार नाहीं किंवा कोणाच्याही आक्रमणापुढें मान तुकवणार नाहीं. यासाठीं आम्ही यशस्वी होईतो लढा चालू ठेवू, मग तो कितीही काळ चालो.

आपण घबराटीचें वातावरण निर्माण होऊं देता कामा नये. अशी परिस्थिति केव्हांही चांगली नसते. अजून तशी वेळ आली नाहीं. आपल्या पाठीशीं संपूर्ण राष्ट्राची संघटित शक्ति उभी आहे. ही एक आनंदाची गोष्ट आहे. ही महान शक्ति देशाचें संपूर्ण स्वातंत्र्य आणि एकता अबाधित राखण्यासाठीं आणि भारताच्या पवित्र भूमिवरील आक्रमकांना हुसकावून लावण्यासाठीं उपयोगांत आणूं या !

पान ४३ वर

## प्र ति ज्ञा

"भारत की पवित्र भूमि पर चीन के आक्रमण से भारत के संतरी हिमालय पर्वत पर महान् आपत्ति आयी है। इस नाजूक समय पर हम सब नागरिक अपनी पूरी निष्ठा अपने राष्ट्र के चरणों में समर्पित करते हैं। भारत की आजादी और एकता पर जो महान् संकट इस समय आया है उससे भारत जबतक पूरी तरह मुक्त न हो हम चैन नहीं लेंगे, किसी भी त्याग और कुरबानी से हम नहीं हिचकायेंगे। अपने राष्ट्र की रक्षा की एक ही जिम्मेदारी रास्ते में कोई बाधा नहीं आने देंगे। हमें अपनी बहादुर सेना पर बडा फख्र है। हम अपनी बहादुर सेना को यकीन दिलाते हैं कि आखरी विजय की माला हमारे राष्ट्र के गले में पड़ने तक हमारे वीर सैनिक जंग के मैदान में जिस अग्निपरीक्षा से गुजरेंगे और जैसा त्याग और कुरबानी करेंगे वैसा ही त्याग और वैसा ही कुरबानी हम भारत के किसान, मजदूर, कारखानदार, कारीगर, व्यापारी और अन्य मध्यमवर्गीय अपने राष्ट्र के जीवन के सभी क्षेत्रों में करेंगे। हम अपनी बहादुर सेना को इस बात का यकीन दिलाते है कि अपनी मातृभूमि की पवित्रता और एकता का विजय हो" जय हिन्द।



अनुक्रमणिका






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





*भूतनाथाचा राग अनावर झाला. त्यानं तरंग खांद्यावर घेऊन सीतेच्या भोंवतीं दोन-तीन फेऱ्या मारल्या. तितक्यांत बाजूला उभा असलेल्या शिवाच्या अंगांत एकदम वारें आलें. भूतनाथानें शिवाला हातानें फर्मावलें मात्र आणि शिवा तिरासारखा धांवत आला......*



# शांत्याची बत्तिशी आणि गोमूत्र

रवाळनाथाचें देऊळ हें साऱ्या गांवाचें श्रद्धास्थान.

ज्यानें दिवसांतून एकदां तरी ' देवा तूं पाव ' असें म्हणत देवळांतील टांगती घंटा बडवली नाहीं असा गांवकरी या गांवांत कधीं दिसत नसे.

रवळनाथाच्या अंगाला कुड्याच्या पानाचे तुकडे लावून कौल घेतल्याशिवाय गांवांतलें पान हालत नसे. लग्नें, मुंजी, घरबांधणी, शेती, आजार, यश, अपयश–साऱ्या सुखदुःखाच्या गोष्टी या रवळनाथाच्या संमतीनें चालत.

रवळनाथाचें देऊळ म्हणजे मामुली देऊळ नव्हे. एखादा भला मोठा राजवाडाच जणुं. भक्तगणांनीं नवसादाखल दिलेली ढीगभर मालमत्ता, विपुल दागिने, मोठा जमीनजुमला. जणुं एक छोटेसें संस्थानच. या देवस्थानाची देखभाल करण्याची जबाबदारी पिढ्यान्‌पिढ्या आमच्या घराण्याकडे होती.

रवळनाथाची मूर्ति अंदाजे सात फूट उंचीची. चांगली भव्य मूर्ति. रोज तेल चोळून काळी तुकतुकीत ठेवलेली. ही मूर्ति फणसाच्या लाकडाची असल्यामुळें गांवांत फणसाच्या लाकडावर अगर खुर्चीवर सुद्धां कुणी बसणार नाहीं. या देवळांत भाळीपाळीनें काम करणारे गुरव होते. चौवीस तास लामणदिवा तेवत ठेवण्यासाठीं जागरूक रहाणाऱ्या पगारी भावणी होत्या. साफसफाई- साठीं नोकरचाकर होते. तिन्हीं प्रहरीं तीनदां नौबती झडवण्यासाठीं नगारखान्यांत वाजंत्री होते त्यांतहि शितल्याची सनई हें मोठें आकर्षण असायचें. शितल्या आजारी आहे हें नौबतीवरून कळायचें. सनई वाजवावी तर शितल्यानेंच. जन्मभर सनई वाजवून वाजवून त्याचे गाल हवा कोंडून ठेवल्यासारखे दिसत. त्या काळांत घड्याळाच्या कांट्यापेक्षां नगाऱ्यावर पडणाऱ्या काठ्यानुसार गांवांतले व्यवहार चालत. पहिल्या नौबतीला उठलों दुसऱ्या नौबतीला पेज जेवायला परतलों. तिसऱ्या नौबतीला घरीं समई लावली अशी त्यावेळीं वेळापत्रकाची भाषा असे.

या देवळांत एक चांदीचा दंडुका होता आणि मखमालीनें सजवलेलें चांगलें एक फूट लांबीचे जुत्याचे जोड होते. तें जुतें घालून आणि तो दंडुका घेऊन गांवाच्या रक्षणासाठीं रवळनाथ दर रात्रीं गांवभर फिरतो असें गांवांतले लोक म्हणत. भर रात्रीं रवळनाथाच्या जुत्याचा आणि दंडुक्याचा आवाज आपण ऐकला होता असें म्हणणारे किती तरी म्हातारे कुळवाडी आमच्या गांवांत होते.

चांभारवाड्यांतल्या प्रत्येक घराण्यानें दरवर्षी भाळीपाळीनें जुत्याच्या जोड रवळनाथाला द्यायचा हें ठरलेलें होतें. दोन वीत लांबीची आणि वीतभर रुंदीची जुतीं वर्षाच्या अवधींत पायांत घालून झिजवल्यासारखीं झिजलेलीं असत. एखाद्या वर्षी चांभाराचें एखादें घराणें रवळनाथाला जुतें द्यायला विसरलें कीं मग साऱ्या चांभारवाड्यावर कोप व्हायचा. पावसाळ्यांत हगवण सुरू व्हायची. त्यामुळें न चुकतां जुतीं पोंचती केलीं जात असत.

फार वर्षांपूर्वी एकदांच हा चांदीचा दंडुका चोरीला गेला होता. दंडुका चोरीला जातांच एकएकीं गांवभर खळबळ झाली. श्रद्धेला, भक्तीला धक्का बसला. अनेकांच्या मुद्रा तर चिंतेनें जळून गेल्या. आतां तर अख्ख्या गांवाला धोका आहे असें जाणते म्हातारे आपसांत बोलूं लागले. गांवांतल्या कांहीं नाठाळ लोकांकडे जाऊन अंदाज घेण्यांत आले. गांवभर शोधाशोध झाली. पण पत्ता लागला नाहीं.

शेवटीं थांगपत्ता लावण्यासाठीं भीतिग्रस्त गांवकरी मोठ्या संख्येने देवळांत जमले. मंडपांत गुरव उभा राहिला. मोठमोठ्यानें ढोल बडवून आणि गाऱ्हाणीं घालून गुरवांवर रवळनाथाचे वारें उभें करण्यांत आलें. नारळ फुटले. देवाचें तीर्थ शिंपडण्यांत आलें. गुलाल उधळण्यांत आला.

गुरवाचें अंग थरथरूं लागलें. नाकातोंडांतून हुत्कार निघूं लागले. तोंडावाटे एक एक शद्ब बाहेर पडूं लागला. आणि सारे जण कान देऊन ऐकूं लागले.

'...माझी काठी मी परत आणतंय... चिंता नको...चोर माझ्या पायाकडे खुळो होऊन फिरतलो...'

लोकांचा जीव भांड्यांत पडला. चोर वेडा होऊन देवळापाशीं येईल हें सर्वांना कळलें. लोक रोजच्या रोज वाट पहात राहिले. आणि अवघ्या चार दिवसांत देवळाच्या शेजारीं रस्त्याच्या कडेला चांदीचा दंडुका दृष्टीस पडला.. त्यानंतर पंधरवड्यांतच शेजारच्या गांवांतला एक इसम वेडा होऊन आला. मरेपर्यंत तो वेडा हातवारे करीत, कांहीं तरी बडबडत, कधीं कधीं रडत देवळाच्या आसपास बसलेला असे.

याच देवळांत वर्षांतून एकदां तरी भूत काढण्याचा प्रकार होत असे. मला आठवतें, मोठी धामधूम करून सुताराच्या सीतेवरचें भूत याच देवळांत काढ्यांत आलें होतें. किरकोळ भूतें खूप असायचीं. तीं सहज जातहि असत. पण कावल्याचें भूत म्हणजे महाभयंकर. सीतेवर कावल्याचचें भूत होतें. कावला ही पोरबाळ नसलेली धोब्याची बायको. असें म्हणत कीं, बऱ्याच वर्षांपूर्वी वेशीवरच्या वडाखालीं एक विहीर होती. आतां ती बुजून गेली आहे. त्या विहिरीच्या आसपास रान माजलेलें होतें. त्या रानांत दारूच्या भट्टया चालत. कावल्याचा नवरा दिवस-रात्र तेथें पडलेला असे. एकदां रात्रीं नवऱ्याला घरीं आणण्यासाठीं कावला तेथें गेली होती...आणि दुसरें दिवशीं सकाळीं कावल्याचें प्रेत वडाखालच्या विहिरींत सांपडलें. कुणी म्हणत काळोखांत पाय चुकून ती विहिरींत पडली. कुणी म्हणत पोरबाळ नव्हतें म्हणून तिनें जीव दिला. तर कुणी म्हणत, दारूच्या धुंदींत नवऱ्यानें तिला विहिरींत लोटलें. कांहीं असो, त्या वेळेपासून कावल्याचें भूत वडावर मुक्काम ठोकून असें. मूलबाळ न झालेल्या सवाष्णीवर तिचें लक्ष असे. दिवेलागणीनंतर अशा सवाष्णीनें त्या वडाखालून जायची सोय नव्हती. पण माहेराहून यायला सीतेला उशीर झाला आणि नाइलाजानें घाबरीघुबरी होऊन ती वडाखालून एकदां दिवेलागणीला घरीं आली.

आतां ती जागा कशी असेल कोण जाणे. पण त्यावेळीं ती जागाच मोठी भयाण दिसायची. ती वाट अरुंद असायची. पाणंदीचा रस्ता आणि पाणंदीच्या तोंडाशीं तो वड. दोन हात रुंदीच्या पाणंदींतून जायचें. दुतर्फा निवडुंगाचीं आणि इतर कांटेरी झुडपें. पायाखालीं सुकलेला पाचोळा. त्यांत दडलेले दगडधोंडे. ठेंच लागली तर अंगठा फुटायचा. त्या पाणंदींतून जाण्याचें संकट सीतेवर ओढवलें होतें. आधीं म्हणे तिला मोठा जाळ दिसला तो जाळ भुताचाच असावा अशा भीतीनें तिनें मोठमोठ्यानें रामनामाचा जप केला आणि झपाझप पावलें उचललीं. वर नजर करून तिनें पाहिलें सुद्धां नाहीं. तेवढ्यांत म्हणे एक वाऱ्याची झुळूक आली आणि झाडाच्या फांद्यावर कुणी तरी नाचल्यासारखी पानांची सळसळ झाली. तेवढ्यांत पदर उडला. कुणी तरी ओढला असें तिला वाटलें. म्हणून तिनें तो जोरकस खेंचला.पुढें येऊन पाहिलें तर तो पदर म्हणे फाटलेला होता. त्याबरोबर ती धांवत सुटली ती घरीं आली. झालेली हकिगत घरीं सांगितली. हा कावल्याचाच प्रताप असें सर्वांनीं सांगितलें.

दुसरें दिवशीं किरकोळ इलाज झाले. पांड्या सुतारानें सीतेच्या गळ्यांत गंडे बांधले. मंतरलेले मणी बांधले. तीर्थ दिलें. अंगारे लावले. कोंबड्या मारल्या. भगत आणले. समंधाला बकरा दिला. इतकेंच नव्हे तर भगताकडून सीतेला डागहि दिले.

पण कांहीं झालें नाहीं. सीता दिवसच्या दिवस उताणी पडलेली असे. सारें अंग थरथरत असे. हाताच्या मुठी कडकडून आवळलेल्या असत. डोळ्यांतून प्राण गेल्यासारखे डोळे ताठरलेले असत. धाप लागल्यागत श्वासोच्छ्वास व्हायचा. ओठांतून सारखा फेंस यायचा आणि मधूनमधून किंचाळत ती ताड ताड जमिनीवर पाय आपटायची. वडावर जाते असें म्हणत पळायला बघायची. त्यामुळें पायांत खोड घालून तिला कोंडून ठेवली होती.

अखेराला रवळनाथाच्या देवळांत सीतेवरचें भूत काढायचें नक्की ठरलें. मला आठवतें, त्या दिवशीं दुपारपासून देवळांत चिक्कार गर्दी जमली होती. मी देवळांत गलों तेव्हां गुरव घाईघाईनें तरंगें सजवीत होते. रंगीत लांकडी

जयवंत दळवी

दांड्याच्या वरच्या बाजूला झुबकेदार अद्वतीनें लुगडें गुंडाळलें जात होतें. त्यावर पितळेचा हात बसविला होता. हें तरंग म्हणजे देवाची निशाणी. दुपारीं तीनच्या सुमाराला देवळाच्या सज्ज्यांत दोन तरंगें घेऊन दोन मानकरी उभे राहिले. शिवा महार घुंगुर बांधलेली एक बांबूची जुनी काठी घेऊन दूर उभा राहिला. सभोंवार उभे राहून पांच महारांनीं गळ्यांतले अगडबंब ढोल घमाघम वाजवायला सुरवात केली. ढोलांचा कर्णभेदक आवाज सर्वत्र घुमून राहिला. तरंगांच्या पुढें नारळ फुटले आणि वरिष्ठ मानकऱ्यांनीं जोरजोरानें गाऱ्हाणीं घातलीं.

थोड्या वेळांत तरंग घेणारांच्या अंगांत देवाचें वारें संचारलें. त्यांचे अंग थरथर कापूं लागलें. नाकातोंडांतून जोरजोरानें श्वासोछ्वास सुरूं लागले. खांद्यावर तरंगे घेऊन त्यांनीं तीं गदगदां नाचवलीं. त्या दोन तरंगापैकीं एक तरंग भूतनाथ या देवाचें होतें. भूतांचा नायनाट करणें हें त्या देवाचें काम. भूतनाथाचें तरंग घेणाऱ्याच्या अंगांत जोरांत वारें संचारलें. भुतास समोर आणण्याचा भूतनाथानें आदेश दिला. दोघांतिघांनीं सीतेला ओढत आणली. पळून जाण्यासाठीं तिची धडपड चालू होती. भूतनाथाच्या समोर यायला भूतें अशींच कचरतात. अंगावर तरंग बसतांच सीता ताडकन् आडवी पडली. अजूनहि तिचें अंग कापत होतें. तोंडांतून फेंस उसळत होता. नजर दगडासारखी होती. दोन्ही हातांच्या मुठी कडकडून आवळलेल्या होत्या.

'जातंय का नाय ?' भूतनाथानें संतापानें प्रश्न विचारला.

सीता कांहीं बोलली नाहीं.

भूतनाथाचा राग अनावर झाला. त्याने तरंग खांद्यावर घेऊन सीतेच्या भोंवतीं दोन-तीन फेऱ्या मारल्या. तितक्यांत बाजूला उभा असलेल्या शिवाच्या अंगांत एकदम वारें आलें. भूतनाथानें शिवाला हातानें फर्माविलें मात्र. आणि शिवा तिरासारखा धांवत आला.

'घालंव या भुताक ?' भूत घालवून देण्याचा हुकूम झाला.

त्याबरोबर हातांतली काठी उचलून शिवानें तिला बडवून काढली. चांगल्या आठदहा काठ्या पाठीवर ओढल्या. तरी सीता रडली, ओरडली नाहीं. भूत असलें म्हणजे काठ्या भुताला लागतात. सीतेला लागत नव्हत्या. पण अकराव्या काठीला सीता एकदम किंचाळली.









तेव्हां सर्वांना कळलें. ती काटी सीतेला लागली होती. भूत पळून गेलें होतें.

भूत काढण्याचा एखाद दुसरा प्रकार वर्षातून असायचाच.

या गोष्टी आतां सांगितल्या तर कोणाला खऱ्या वाटणार नाहींत. पण मी हें स्वतःच्या डोळ्यानें पाहिलें आहे. खरें वाटण्यासाठीं श्रद्धाहि हवी.

मला आठवतें, एकदां मलाहि रवळनाथाच्या दरबारांत शिक्षा भोगावी लागली होती. आमच्या पानवेलीपेक्षां बाबुलीच्या परसातल्या पानवेली माजलेल्या होत्या. एकेका पोफळीवर वेल नुसते तरारून माजले होते. त्यामानानें आमच्या पानवेली अगदींच रोडावल्या होत्या. तें सहन न होऊन मी एक दुष्कृत्य करण्यास उद्युक्त झालों. एकदां आमच्या परसांत खड्डा खणून ठेवला आणि मग भररात्रीं लपत छपत बाबुलीच्या परसांत घुसलों. एकामागून एक अशा पानवेली झपाझप ओरबडून काढल्या आणि त्या साऱ्या खड्ड्यांत पुरून टाकल्या.

आतां बाबुली काय करतो तें पहाण्यासाठीं मन उत्सुक झालें होतें.

तेवढ्यांत दुपारीं तीन साडेतीनच्या सुमारास शान्त्या न्हावी आला. शान्त्या येतांच मला आश्चर्य वाटलें. कारण एकदां धोपटी घेऊन सकाळीं बाहेर पडलेला शान्त्या पुढ्यांत बसेल त्याची खरडपट्टी करून दुपारीं बाराला घरीं जायचा. त्यानंतर तो फारसा इथें तिथें दिसत नसे. म्हणून डोक्याला टुवाला गुंडाळून आलेल्या शान्त्याला बघतांच मला आश्चर्य वाटलें.

शान्त्याशीं कांहीं बोलायच्या आधींच त्यानें माझ्या लक्षात येईल अशा पद्धतीनें ढेकर दिला.

'काय रे शान्त्या ? आज जेवण जड झालां कीं काय ?'

'आज प्रसादाचा कोंबडा खाल्ला !' त्यानें पुनः एकदां ढेकर दिला. कोणत्याहि गोष्टी हुकमी करण्यांत त्याचा हातखंडा आहे.

'प्रसादाचा कोंबडा ?' माझी जिज्ञासा जागृत झाली.

'बाबुलीच्यो पानवेली कोणी तरी उगटून टाकल्यो. त्येका हगवण लागूं दे म्हणून बाबुलीन् रवळनाथाक कोंबडा दिला !' शान्त्यानें मुद्दाम सारें स्पष्टीकरण केलें. हजामती करण्याबरोबरच देवाला कोंबड्या द्यायचेंहि काम तो करीत असे. त्यासाठीं त्यानें स्वतः कोंबड्या पाळल्या होत्या. सव्वा रुपया दिला कीं एका कोंबडीला पकडायचा. दोरीनें पाय बांधायचा आणि कोंबडी उलटी धरून देवळाचा रस्ता धरायचा. मुद्दाम कोंबडी हालवीत जायचा. म्हणजे मग वाटेंत भेटणारे लोक कोण, कशासाठीं कोंबडी देतो आहे अशी चौकशी करायचे. त्यांना तपशील पुरवीत शान्त्या देवळांत यायचा. त्यामुळें देवाला कोंबड्या देणाऱ्या त्याच्या धंद्याचीहि जाहिरात व्हायची आणि गांवांत कुठें काय घडतें आहे याचीहि सर्वांना माहिती मिळायची. शिवाय त्याला घरचेंच कोंबडें खायलाहि मिळायचें.

पण ज्याअर्थीं उपटून टाकलेल्या पानवेलीबद्दल बाबुलीनें देवाला कोंबडं दिलें हें सांगायला शान्त्या मुद्दाम आमच्या घरीं आला त्याअर्थीं भडव्याला माझा संशय होता हें माझ्या लक्षांत आलें. पण मी तसा हार गेलों नाहीं. बाबुलीच्या पानवेली मी ओरबाडल्या हें मी त्याच्यापाशीं मुळींच कबूल केलें नाहीं.

पण शान्त्याला खुंटा हाल्वून घट्ट करावयाचा होता.

तो म्हणाला, 'ज्येनी पानवेली तोडल्यो त्येका दोन कलाकांत हगवण सुरू होतली. रवळनाथाचो कोप भारी प्रखर !'

तरीहि मी हटलों नाहीं. कांहीं बोललों नाहीं.

मग शान्त्या निघून गेला. पण तो गेला तरी माझें मन मात्र मलाच खात होतें. रवळनाथावर एवढी श्रद्धा होती कीं त्याच्या कोपामुळें मला हगवण लागेल कीं काय या भीतीनें मी अस्वस्थ झालों. त्यानंतरच्या दोन–तीन तासांत मी तांब्या घेऊन सारखा धावूं लागलों. पोटांत दुखत नव्हतें. तरी दुखल्यासारखें वाटत होतें. आतां आणखी थोंडावेळ थांबलो तर हगवण लागेल या धसक्यानें शेवटीं संध्याकाळीं शान्त्याच्या घरीं गेलों आणि आतांच्या आतां उलट मूठ मारण्यासाठीं रवळनाथाच्या पुढ्यांत कोंबडें मार असें सांगून मोकळा झालों. रवळनाथापुढें ताबडतोब कोंबडें मारलें म्हणजे पोटदुखी तात्काळ थांबेल असें मला वाटलें होतें. पण ताबडतोब कोंबडें मारायला शांत्या तयार झाला नाहीं. तो म्हणाला, कोंबडें रात्रीं मारलें तर उलट मूठ बरोबर बसत नाहीं. तें दुपारीच मारायला पाहिजे. पण बाबुलीनें मारलेल्या कोंबडीचा जोर कमी करण्यासाठीं त्यानें घरच्या घरींच रवळनाथाला गाऱ्हाणें घातलें. उद्यां दुपारी कोंबडें कापीन असेंहि त्या गाऱ्हाण्यांतून देवाला आश्वासन दिलें. मग घडाभर पाणी त्यानें माझ्या पायावर ओतलें. आंत गेला आणि चुलींतली थोडी राख आणून ती माझ्या टाळूवर फुंकली आणि सव्वा रुपया कनवटीला लावून देवस्कीचें कार्य पुरें केलें. त्यानंतर 'हगवण मात्र लागली नाहीं.'

**पण थोड्याच दिवसांत शांत्याची लबाडी उघडकीस आली.**

मला हगवण लावतो असें बाबुलीला सांगून त्यानें कोंबडें मारायला म्हणून सव्वा रुपया बाबुलीकडून उपटला. कोंबडें मारून बाबुलीनें मारलेली मूठ परतवून लावतो असें मला सांगून त्यानें माझ्याकडूनहि सव्वा रुपया उपटला. दोन्ही वेळीं कोंबडी मारलीच नाहीं. उलट मी सारखा तांब्या घेऊन धांवतो आहे असें त्यानें दोन दिवस बाबुलीला सांगितलें. तूं कोंबडं मारलेस म्हणून हगवण लागली नाहीं असें मला सांगितलें. पण तेवढेंहि करून त्याचें समाधान झालें नाहीं. मी उलट मूठ मारण्यासाठीं सव्वा रुपया देत होतो पण ते पैसे आपण घेतले नाहीं असें बाबुलीला सांगून त्यानें त्याच्याकडून नुकसानभरपाई म्हणून आणखी सव्वा रुपया घेतला. या साऱ्या प्रकरणामुळें पानवेली मी तोडल्या हें बाबुलीला कळलें. आणि दुसऱ्या दोन चार दिवसांतच आमच्या परसातल्या पानवेली नाहीशा झाल्या.

मला मात्र हा सारा मार मुकाटपणें सहन करावा लागला. कारण शांत्याला बडवावें तर त्यानें आबाकडे कागाळी केली असती. आणि जें जें झालें तें सारें त्यांना कळलें असतें. मग मलाच मार खावा लागला असता. कारण बाबुलीच्या परसांत जाऊन त्याच्या पानवेली मी तोडल्या हें आबांना मुळींच आवडलें नसतें. शिवाय कोंबडें मारायला दिलेला सव्वा रुपया मी चोरून आणला होता. म्हणून जबरदस्तीनेंच मला शान्त्याची गय करावी लागली.

पण हा राग मी मनांत ठेवून होतो.

त्यांत पुनः आणखी एका प्रसंगाची भर पडली. शात्याचीं लबाडी दोनदां उघडकीला आली.

श्रावणांत देवळासोर दरवर्षी दहिकाल्याचा उत्सव असे. एका भल्या मोठ्या मडक्यांत दोन चमचे दूध आणि बादलीभर पाणी घालून तें देवळासमोर टांगलेलें असे. मग वाजत गाजत पालखी निघायची. पानपतावर जमल्यासारखी मडक्याखालीं भाऊगर्दी जमायची आणि मग सर्वांसमक्ष आबा काठीनें तें मडकें फोडायचे. त्या मडक्यांतलें दुधाळ पाणी अंगावर घेण्यासाठीं आणि मडक्याची कवची मिळवण्यासाठीं लोक नुसते धडपडायचे. कवची मिळाली म्हणजे घरच्या गोठ्याला बरकत येते, दूधदुभतें वाढतें अशी सर्वत्र समजूत होती. त्यामुळें कांहीं क्षण त्या जागीं नुसती रणधुमाळी माजायची. त्या रणधुमाळींत घुसून कवची हस्तगत करण्याचें धाडस मला होत नसे. पण कवची मिळावी अशी तर जबरदस्त इच्छा असे. एकदां मी शान्त्याला आगाऊ सांगून ठेवलें, मडक्याच्या एका कपचाला एक पैसा देईन. दहिकाल्याची गर्दी ओसरतांच शान्त्यानें माझ्या हातांत चार तुकडे दिले आणि एक आणा कनवटीला लावला, पण तुकडे सुकलेले पाहून मला संशय आला आणि तो संशय खरा ठरला. गर्दींत घुसून मडक्याचे कपचे आणण्याची तसदी न घेतां चोरानें घरच्याच फुटक्या मडक्याचे चार तुकडे उपरण्यांत बांधून आणले होते.

त्यामुळें शान्त्याला चांगली अद्दल घडवावी असें सारखें वाटत होतें.

त्यानंतर एका आठवड्यांतच संधि चालून आली.

एकदां आबांची दाढी करण्यासाठीं सकाळींच शान्त्या आला. दाढी उरकली आणि घाईघाईनें तो बाबुलीकडे गेला. येतांना आमच्या पडवीच्या खुंटीवर त्यानें एक पिशवी टांगली होती. ती तो विसरला होता कीं बाबुलीकडून आल्यावर नेणार होता, कोण जाणे! पण शान्त्याची पाठ वळतांच माझी जिज्ञासा जागृत झाली. मी पिशवींत काय आहे तें चोरून पाहिलें. कागदांत गुंडाळलेली परदेशीं दारूची बाटली होती. कुणाला तरी देण्यासाठीं म्हणून त्यानें ती आणली होती. हा चोरटा धंदा तो पूर्वीपासूनच करायचा. आबांनीं पूर्वी अनेकदां त्याच्याकडून अशा बाटल्या घेऊन पोलीस अधिकाऱ्यांना दिल्या होत्या. गोव्यांतून तो ह्या बाटल्या आणायचा.

मला शान्त्याला जिरवण्याची एकदम कल्पना सुचली. एका तांब्यांत मी हळदीचें पाणी तयार केलें आणि बाटली घेऊन चोरट्या पावलांनीं गोठ्यांत गेलों. कोणतीहि गोष्ट चोरून करण्यासाठीं गोठा ही जागा उत्तम होती. मी बाटली उघडून आंतली दारू गायरींत ओतली. दारूऐवजीं बाटलींत हळदीचें पाणी भरून ठेवावें असा विचार होता. तेवढ्यांत गाईनें शेपूट वर केलें. त्यासरशीं एकदम डोक्यांत कल्पना चमकली. तांब्यांतलें हळदीचें पाणी ओतून मी तांब्यांत गोमूत्र धरलें आणि तें बाटलींत ओतलें. बाटलीचें बूच लावलें. बुचावरची बेगड चिकटवून ठेवली. आणि बाटली कागदांत गुंडाळून ती जागच्याजागीं पिशवींत ठवून दिली.

बाबुलीकडून घाईघाईनें शांन्त्या आला, आणि पिशवी घेऊन तरातरा निघून गेला. ही बाटली तो बाबुलीला देईल आणि गोमूत्र तोंडांत गेल्यावर बाबुली त्याला लाथेनें बडवील असा माझा कयास होता.

पण तो कयास साफ चुकला.

पिशवी घेऊन शान्त्या चावडीवर गेला आणि बाटली हवालदाराला दिली. कारण त्या रात्रीं कोतवालासाठीं चावडीवर कोंबडी-वड्यांचें जेवण होणार होतें.

त्यानंतर चावडीवर काय घडलें कोण जाणे. दुसरें दिवशीं दाढ ठणकत असल्यामुळें तोंड सुजलें असें सांगत शान्त्या फिरूं लागला. पण हवालदारानें आपल्याला चपलानें मारलें, तोंड फोडलें हें त्यानें कुणाला कळूं दिलें नाहीं.

या प्रसगाची आठवण झाली म्हणजे आतां मात्र मला वाईट वाटतें.

●●●








# देणाऱ्यानें देत रहावें......

श्रीपाद काळे

शालिनीचें लग्न झालें, आणि ती सासरीं आली. माहेर आणि सासर यांत आठ दहा मैलांचें अंतर होतें. वाट होती, ती डोंगर कातळावरून – साधी बैलगाडीची चाकोरी सुद्धां वाटेंत दिसत नव्हती.... सारा प्रवास पायींच होता. दुपारीं जेऊन खाऊन निघालेली माणसें चांगली रात्र पडली, आणि घरीं पोचलीं. दमल्यामुळें प्रत्येक माणूस ओढल्यासारखें चालत होतें. वाटेंत प्यायला पाणी मिळालें नव्हतें. शालिनीच्या नवऱ्यानें एका झाळीचा आडोसा घेऊन विडी ओढली होती. हाताला चंचींचा बंद गुंडाळून पान खाणें चालूच होतें. त्यानें टोपी वाकडी घातली होती आणि चांदीच्या जाड बटणांच्या कोऱ्या शर्टाचा पुढचा भाग उघडा टाकला होता. गळ्यांतली खरी खोटी चेन शर्टाच्या कॉलरवर ओढली होती. –माणसें गांवांत आलीं. शालिनी सर्वांच्या मागून चालत होती. चुलत नणंदेचें मूल मध्यें मध्यें तिनें कडेवर घेतलें होतें– आणि कोणाचा पाय मुरगळला, तर चौकशी करत होती– आतां हीं माणसें तिचीं होतीं– तोंडांत अखंड शिव्या असणारा शुभ्र केसाचा म्हातारा तिचा सासरा होता. दम्यानें धपापणारा होता, पण टणक होता. लग्नांत क्षुल्लक कारणावरून त्यानें नातेंगोतें लक्षांत आणलें नव्हतें– देहावर यथेच्छ मांस चढलेली– चालतांना उजव्याडाव्या हाताचा रेटा मांडीवर देऊन चालणारी, आणि मारक्या गुरासारखी ज्याच्यात्याचाकडे बघणारी बाई तिची सासू होती. नमस्कार केल्यावर सुद्धां त्या माऊलीच्या तोंडून चांगला शब्द फुटला नव्हता–आणि पुढें तर तिचा मालक चालला होता. काळ्या रंगाचा आणि राठ दाढीचा–हेतुतः केलेला त्याचा स्पर्श शालिनीला आठवत होता, आणि त्या स्पर्शानें वास्तविक तिचें सर्वांग फुलायचें, मोहरायचें, तें शहारा आणत होतें– त्याच्या नजरेनें तो एका मुठीनें मुरगळून टाकील कीं काय असें वाटत होतें–त्याच्या पावलाच्यावर गजकरण-नायट्यासारखे कसले डाग दिसत होते, आणि हाता-पायाचीं बोटें थिटीं, आणि राकट वाटत होतीं –पण तो तिचा आतां मालक होता. तो मागेल तें आतां निमूटपणें त्याला द्यायला हवें होतें–म्हणेल तें ऐकायला हवें होतें.—

आतां येणारें घर तिचें होतें–त्या घराच्या ऊर्जितावस्थेसाठीं जन्म काढायचा होता, त्या घरांत वंश निर्माण करायचा होता–घराण्याला जें जें हवें तें तें द्यायचें होतें–मुकाटपणी–हो मुकाट्यानें—

—येणाऱ्या घराकरतां–या माणसाकरतां जें जें द्यायला हवें, तें तें द्यायला शालिनी तयार होती–पुढें चालणारा हा माणूस अशिक्षित आहे, हें तिला माहित होतें–जाणाऱ्या घरांतली परिस्तिती तिला कळली होती–या पूर्वी तिला अनेक जण बघून गेले होतें–पण कोणींच तिला पत्करलें नव्हतें–शेवटीं यानें शालिनीचें दान मागितलें आणि तिनें बापाला ओंजळ करायला सांगितली.

—शालिनी चालत होती. कडेवरच्या मुलाचें ओझें संभाळत चालत होती–पाण्यामुळें घशाला कोरड पडत होती, आणि दुपारचें तिखट मिठाचें जेवण घशाशीं गर्दी करत होतें– चालतां चालतां मटकन् खालींच बसायला होते कीं काय असें वाटत होतें......

—लहानपणापासून शालिनीचें हें असेंच चाललें होतें–कांहीं माणसें गेल्या जन्मीं कांहीं करून ठेवून भोगायला या जन्माला येतात....काळजीचा रोग, आणि परिस्थितीशीं झगडणी, यासाठींच त्यांचें आयुष्य असतें.—शालिनी लहान असतानाच तिची आई मेली होती. मरतांना एक किरं कारें शालीनीचें मांस, नि मन ओरबायला तिनें पाठीं ठेवलें होतें–नवऱ्याचें उतरतें वय देवाघरीं जातांना तिनें लक्षांत घेतलें नव्हतें–आई मेली तेव्हां शालीनी आठदहा वर्षांची होती. अशा मुलांना नकोएवढी समज उमजतानाच देव देऊन ठेवतो. शालिनी तीनचार वर्षांची असतानाच लहान लहान भांडी चक्क करायची, दहाबारा वर्षांची असताना ती केरवारा करी, आणि चार माणसांचा स्वयंपाक सुद्धां करी. थापलेली भाकरी तव्यापर्यंत पोंचत नाहीं, तेव्हां खालीं कळीचा फाळका घेण्याची युक्तीहि तिला सुचली होती. घरांतलें सारें करून ती शाळेंत जाई....

शालिनी आणखी जरा मोठी झाली. आणि तिच्या बापाची सावकारी नोकरी सुटली. बायको मेल्यापासून संसारांतलें त्याचें लक्ष उडाल्यासारखें झालें होतें–तो दुसरें लग्न करायला बघत होता–मध्यस्थाला त्यानें कांहीं पैसेहि दिले होतें–पण ते जमलें नव्हतें. मग पुनर्विवाह करायची तयारी होती, पण तेंहि जमलें नव्हतें–मग तो शांत आणि संयमी माणूस वैतागल्यासारखा झाला होता– आपला राग मग तो शालिनीवर काढत होता. तिला कपाळकरंटी म्हणत होता, आणि केव्हां केव्हां हातहि उचलत होता– पण शालिनी त्यालाही जपत होती—भावडाचें करत होती, आणि धाकट्या भावाची काळजी वहात होती—मराठी सातवी झाली, आणि मग तिनें शाळाच सोडली.

—बापाची थोडी शेती होती. नोकरी गेली, तेव्हां त्यानें शेतीकडे लक्ष घातल्यासारखें केलें. लहानपणीं केव्हांतरी शेतीच्या केलेल्या गोष्टी

*शालिनी नवऱ्यासाठीं खपूं लागली. सासू-सासऱ्यांच्या शब्दानें रामावत नव्हती नवरा सांगेल तें ऐकत होती. स्वतःची अनुकूलता, प्रतिकूलता बोलत नव्हती...जें जें दुसऱ्याला हवें तें तें द्यावें एवढेंच तिला माहीत होतें—*

---

तो विसरला नव्हता. त्यानें म्हातारेसे दोन बैल घेतले. स्वतः जोत धरी—मग तें कसब शालिनीहि शिकली. बापाला व भावंडांना जगवायला हवें होतें—वेळेवर कष्ट केले, तर पेजपाणी मिळणार होती. उजाडायच्या आंत घरांतलें करून ती शेताशीं ओणवी होई—पुढें काम दिसत राहीं, आणि मनांत काळजी वसत राही—एकदोन वर्षें अशीं गेली. आणि ऐन पावसाच्या दिवसांत एक बैल मेला. सुरवातीला जमीन नांगरतांना तो दळ्यांत बसला. तो गडी करून उचलून गोठ्यांत आणावा लागला. शालिनीनें हातांत होते ते इलाज करून बघितले. वैद्य सांगेल तीं औषधें केलीं, पण तो बैल खटी पडून मेला—पाऊस पडत राहिला—तरवा वाढत राहिला. कोणाचें जोत बोलावलें, तर काणाला सवड होत नव्हती...शेवटीं बाप म्हणाला, 'आतां एका बाजूनें तूं ओढ—'

—आणि शालिनीनें जूं मानेवर घेतलें—प्रत्यक्ष मानेवर नाहीं—दोन्ही हातांनीं ती नांगर ढकलूं लागली. कमर कसकसूं लागली. नांगर थांबला, कीं तिला उभें रहातां येईना. रात्रीतर अंगाचा गोळा होऊन जाई-सकाळीं पाय जवळ येत नसत... पण ती नांगर ओढतच होती. वाटेन येणारा जाणारा थांबून थांबून बघत राही—दोन तीन दिवस तिनें हें काम केलें, आणि कुणाला तरी तिची दया आली—स्वतःचें जोत नेऊन त्यानें उभें केलें...सातवीच्या परीक्षेंत शालिनीला कमी मार्क पडले होते त्यामुळें तिला शिक्षिकेची नोकरी मिळत नव्हती. ती झटत होती, जेवढें कष्टानें श्रमानें बापाकरितां—भावंडाकरतां करतां येत होतें, तें करत होती.

शालिनीचें वय वाढत चाललें. या पोरीचें बरें व्हावें, असें अनेकजणांना वाटत होतें. प्रसंगीं स्वतःच्या पदराला चाट लागली, तरी पत्करायला लोक तयार होते. शालिनी सद्गुणी होती, हें साऱ्यांना माहीत होतें, आणि ती कमनशिबी आहे, हेंही अनेकांना ठाऊक होतें. पण शालिनीच्या रूपापुढें सर्वांनी हात टेकले होते. शालिनी काळी होती. मूळची ती काळीच. पण काळ्या वर्णाला सुद्धां एक तेज असतें—एक चमक असते—नाक डोळे ठसठशीत असले, म्हणजे काळा वर्णसुद्धां



अनुक्रमणिका

# लढा वीरहो, लढा !

लढा, वीरहो लढा, लढा
पराक्रमानें अधिक उंचवा हिमालयाचा कडा, कडा

शेजाऱ्यांचे शूर शिपाई
सीमा रेषा पुसुनी पायीं
लुट्टूं पाहती तुमची आई
त्या ढोंग्यांच्या मुसक्या बांधा, भ्याडां हातीं भरा चुडा

काल बिलगले भाऊ म्हणुनी
आज शांतिला दुर्बल गणुनी
काढूं पाहती मूळच खणुनी
तोडा त्यांचे हात अडाणी, कबंध तुडवित चढा, चढा

कपाटासंगें शौर्य भांडु द्या
तसूतसूवर रक्त सांडु द्या
आक्रमकांचा श्वास कोंडू द्या
तुमच्या तोंडीं विजयश्रीचा, सूर लागु द्या खडा, खडा

रणमर्दानो, तुमच्या पाठीं
मारित मारित मरण्यासाठीं
उभा भारतिय चाळिस कोटी
हटवा मागें पिशाच्च पिवळें, उडूं द्या तोफा धडा, धडा

—ग. दि. माडगूळकर

शामल दिसतो. परंतु शालिनीचें अंग करपल्यासारखें झालें होतें—कोवळेपणा असा कांहीं राहिलाच नव्हता. कपाळ लहान होतें, आणि डोळे कुठें आहेत, तें कळत नव्हतें. हसायचें, खिदळायचें ती कधींची विसरली होती. कळत होतें, तें फक्त तिचे श्वास आणि टाकल्यासारखी धरलेली मान...खुजेपणा हा आणखी एक दोष...खूप उन्हाळे-पावसाळे जाऊन सुद्धां एखादें रोंप तसेंच रहावें. खांद्या खांद्यात त्याचा जूनपणा भरावा, असें शालिनीकडे बघून वाटत होतें. या रूपाची तिला जाणीव होती, हें आणखी वाईट होतें. कैकजण बघून जात होते, आणि नाकारीत होते. या मुलीकडे बघून पहाणाऱ्याच्या काही भावना जागृत होत नव्हत्या. ही मुलगी पहाणाराला निर्विकार मनाची दिसस होती.

अखेर वीस-बावीस वर्षांच्या शालिनीला पुढें चालणाऱ्या महा-भागानें पत्करली होती—एक दिवसांत कार्य उरकलें होतें—त्या एक दिवसांत सुद्धां पुष्कळ भांडणें झालीं होतीं—

शालिनी कडेवर नणदेचें मूल घेऊन कापावरची पायवाट चालत होती.

—शालिनीनें आपलें घर पाहिलें—शालिनीजवळून बरेंचसें घ्यायला तें आसुसलें होतें—इथें तिथें सारा केरच होता. केव्हांचें बांधलेलें नव्याच्या पौर्णिमचें भाताचें केसर घातलेलें आंब्याचें पान लोंबत होते, त्याला धरून कोळ्यानें आपलें जाळें विणलें होतें—नुकती उपजलेली एक पाल बाराला धरून होती. पांच वर्षांपूर्वीचें एक कॅलेंडर फडफडत होतें—दारांत खोल विहीर होती. तांब्याभर पाणी लागलें, तरी हातरहाटानें काढून घ्यावें लागत होतें—जवळ एक कात्री जास्वंद होती, आणि तिचीं लाल फुलें ओशाळल्यासारखीं लोंबत होतीं. दारांतल्या फणसाच्या पानांचा खच पडला. होता. घराच्या भिंती उभ्या होत्या एवढेंच.

शालिनीच्या नवऱ्याला उद्योग असा फार किंवा मुळींच नव्हता. सकाळीं तो बाहेर जाई, आणि डोक्यावर सूर्य आला कीं घरीं येई. त्याला भजनाचा नाद होता. तो मृदंग चांगला वाजवतो म्हणत. शिवाय अंभगहि सांगे—घरींसुद्धां ताल आला कीं डावा हात गालावर टेकून तो किंचाळल्यासारखा अशुद्ध अभंग म्हणत राही—गौळण म्हणताना डुलत राही.

शालिनीला लौकरच कळलें, कीं नवऱ्याची आपण नांवापुरतीच बायको. त्याचें लक्ष दुसरीकडेच असतें. त्याचा नाद असलेली बाई गांवांतच होती. तिचा नवरा मेला होता आणि शालिनीच्या नवऱ्याचा नाद तिला लग्नाआधींपासून होता—

—शालिनीनें हें शांतपणें मनांत रिचवलें—आणि ती घरासाठीं—नवऱ्यासाठीं—खपूं लागली. सासूसासऱ्याच्या शब्दांनीं रागवत नव्हती. नवरा सांगेल तें ऐकत होती. अशावेळीं स्वतःची अनुकूलता—प्रतिकूलता बोलत नव्हती...जें जें दुसऱ्याला हवें तें तें द्यावें, एवढेंच तिला माहीत होतें—

तिला मुलगा झाला आणि चारसहा महिन्याच्या फरकानें सासू-सासरा मेली—कधीं तरी नवरा सुधारेल, केव्हांतरी त्याला दया येईल, ही खुळी आशा मनाशीं जनावत होती...पण बापाचा नाहीं म्हटला तरी त्याला थोडा धाक वाटत असावा—तो मोठ्यानें बोलत नव्हता. विडी ओढी तो थोडासा आडोसा बघून ओढत होता. बाप मेला नि तो मोकळा झाला. आपल्याला बायको आहे, मुलगा आहे, हेंहि तो

विसरत चालला. भिनलग्नाच्या बाईशीं तो राजरोसपणीं राहूं लागला. तिला घरीं आणूं लागला.

—आणि शालिनीला दोन वर्षांनीं दुसरा मुलगा झाला. नवऱ्याचें इतर धंदे वाढत चालले...घरांत केव्हां कांहीं असे, केव्हां नसे—एकदां शालिनीच्या स्वभावाला तडस लागल्यासारखी झाली खरोखर वेड लागायची पाळी आली, आणि नवऱ्याला एकदां ती रागानें बोलली...वात झाल्यासारखी बोलली. नेसायला धड लुगडें नव्हतें. घरांत तांदुळ नव्हतें—हें सारें माहीत असून तो त्रयस्थासारखा—अनोळखी माणसासारखा घराबाहेर निघाला. शालिनी बोलली. सोरं ओकून टाकल्यासारखें बोलली. काय व्हायचें असेल तें होऊं दे या निर्धारानें बोलली. तिचा नवरा तसाच मागें फिरला, आणि त्या कुरूप, टीचभर कुडीच्या बाईला त्यानें मरेमरेपर्यंत मारलें—केस धरून फरफटत आणलें,...

—आणि मग रोज रोज तो दात ओठ खाऊं लागला. एकदां पाऊस पडत होता...रात्र झाली होती. घरांत ओल आली होती. मुलाला कांहींतरी पांघरायला हवें होतें. शालिनीला कळलें होतें, आपल्या नवऱ्यानें बिनलग्नाच्या बायकोला नुकतेंच लुगडें घेतलें आहे. ...हें ऐकून चार दिवस झालें होतें—तरी ती गप्पच होती—पण यावेळीं वैर धरल्यासारखें शद्ब तिच्या तोंडातून बाहेर आले...मग तिच्या नवऱ्यानें पुन्हां केस धरून तिला घराबाहेर काढलें, आणि दरवाजा लाऊन घेतला. बाहेर पाऊस पडत होता—आणि शालिनी रडत होती. पावसाचें पाणी अंगणांत साचत होतें—उद्यां ऊन पडलें म्हणजे तें नाहींसें होणार होतें—तिथें शालिनीच्या आहेत नाहींत असणाऱ्या डोळ्यांतल्या पाण्याची काय कथा !

—शालिनीनें एक दिवस उपाशीं काढला. तिचा नवरा मुळीं तिला घरांतच घेईना. लहान मुलगा भुकेनें ओसरीवरच्या गजांना धरून आईकडे बघून रडत होता. कुरूप शालिनीला पान्हा फुटत होता—पण पाषाण हृदयी नवऱ्यानें दाराला कडी घातली होती. शालिनीनें पुष्कळ विनवून पाहिलें. पुन्हां बोलणार नाहीं म्हणून शपथा घेतल्या—पण तो म्हणे, तू हवी तिथें जा—हें घर तुला वर्ज्य.—'

—शालिनी शेजारीं गेली नाहीं....रडत रडतच ती वाटेला लागली—गांव मागें पडलें—आणि रडून रडून दमल्यासारखें तिचे डोळे झाले—नवऱ्याचा संसार तिच्या डोळ्यापुढें आला...बिनलग्नाच्या बायकोजवळचा त्याचा शृंगार तिच्या डोळ्यापुढें उभा राहिला—नवऱ्याची बिनलग्नाची बायको रंगेल होती आणि रंगेल होती. तिचा वर्ण केंवड्याच्या पिवळ्या पातीसारखा होता....केसांना कानावरून वळण देऊन केवढातरी आंबाडा ती मानेवर सोडल्यासारखा घाली. नाक सरळ होतें, आणि तोंडांत पान असल्यानें ओठ रंगलेले होते—हनुवटीवर हिरवा तीळ होता. अंगाला गोंडसपणा होता, आणि सुगंधी तेल तिनं कधीं माखलें कीं त्याचा सुवास घरभर पसरे—आणि शालिनीला स्वतःचें रूप जाणवलें...सुकलेल्या काटकीसारखें हात तिनें न्याहाळले... नवरा नेहमी म्हणे, तुला हसतांच येत नाहीं—लाडे लाडे बोलताच येत नाहीं—आणि तें खरें होतें...

शालिनी वाट चालत होती, आणि नवरा वागतो, तेंच बरोबरसें तिला वाटूं लागलें होतें—बिनलग्नाच्या बायकोशीं वागतांना त्याला स्वतःचें भान रहात नाहीं—आपल्यापुढें आला, कीं कपाळाला आठी

असते–त्या दोघांच्या हंसण्यांत, रहाण्यांत आपली अडचण होते–हेंही तिला समजूं लागलें—

—शालिनी बापाकडे आली...तिचें दोन दिवसाचें रहाणें बघून बाप काय समजायचें तें समजला. मग त्यानें खोदून खोदून विचारलें, आणि शालिनीकडून सारें वदवून घेतलें...नाहीं म्हटलें तरी शालिनी गेल्यापासून घरांत पंचाईतच चालली होती. शेतावर जायला कोणी नव्हतें. मोठ्या मुलांकडून कांहीं आशा करायला नको होती. जेवायला–खायला एकेक नग होते–धाकटा तर जन्मापासून वसूलीच करायला आला होता...शालिनी बापाकडे आली––लग्नाच्या आधींसारखी कामधंदा करूं लागली. चार घरचीं धुणीभांडीं तिनें पत्करली—कारण या घरांतलीं चार माणसेंसुद्धां तिचीच वाट बघत होती. अजून बरेंचसें शालिनीकडून त्यांना घ्यायचें होतें—

शालिनीला नवऱ्यानें जवळजवळ टाकलें होतें––शालिनीकडून वंश निर्माण करून घेतला होता आणि स्त्री म्हणून शालिनीची गरज त्याला उरली नव्हती...शालिनी परित्यक्ता झाली होती—तरी नवऱ्याचें बरें व्हावें असेंच तिला वाटत होतें. वटपौर्णिमेचा उपास ती भक्तिभावानें करत होती...आणि मुलांच्या आठवणींनें कण्हत होती, कुंथत होती. मुलें दृष्टीसमोर असावीशीं तिला वाटत होतीं...धाकटा मुलगा भुकेनें व्याकुळ झालेला तिला आठवत होता. आणि मग पान्हा आवरणें तिला कठीण जात होतें––एवढेंच ती मागत होती, एवढीच आशा जगत होती—पण शालिनीचा जन्म घेण्यासाठीं नव्हताच मुळी.–



—पुष्कळ वेळां नवऱ्याला, मुलांना बघण्यासाठीं तिचें मन ओढ घेत होतें— एखाद्या रात्रीं तर तिला वाटत होतें, असेंच्या असें बाहेर पडावें–मुलांना बघावें, नवऱ्याला बघावें आणि त्याच्या कपाळाला तिडीक उठली, तर मग तसेंच मागें फिरावें–पण बापाकडेसुद्धां तिच्या श्रमासाठींच माणसें वाट बघत होतीं. कोणाकोणाला म्हणून दूर करावें—बापाचे पाय रात्रीं वळतात, म्हणून तो खाटेच्या कोपऱ्यास जोरजोरानें पाय आपटीत असतो.

—तिच्या पेक्षां दोन भाऊ मोठे होते–वास्तविक त्यांचीं एव्हां लग्नकार्यें व्हायचीं, आणि चार लहान मुलें नांदायचीं—पण त्यांच्या लग्नाची कोणी वार्ताच काढत नव्हतें. कोणी कांहीं हिताचे चार शब्द सांगितलें, तर भांडायलाच उठत होते—घरांत काय असेल तें बकाबक खात होते, आणि रिकामे फिरत होते—

—दसरा संपला, तरी पाऊस कमी झाला नव्हता. आधीं कधींतरीं नि केव्हांतरी पडून साऱ्यांना काळजी करायला लावणारा पाऊस पिकलेल्या भातावर धो धो कोसळत होता–शालिनीला कोणीतरी सांगितलें, कीं तिच्या नवऱ्याची बिनलग्नाची बायको दुसऱ्या कोणाबरोबर तरी पळून गेली–तिचा नवरा आजारी आहे, आणि दोन्ही मुलांना सुद्धां खोकला लागला आहे—

—शालिनीनें हें ऐकलें...आणि तिचें मन सारखें तिकडें ओढ घेऊं लागलें–जिथें तिथें तिला आजारी नवरा, आणि खोकणारी मुलें दिसूं लागलीं. गेले चार महिने मनाला तिनें बरेंच आवरलें होतें–मनाच्या आहारीं ती गेली असती, तर या आधींच ती नवऱ्याकडे गेली असती–

पाऊस धो धो पडत होता—लोकांची दैना दैना उडवित–रात्रभर शालिनी बेचैन होती. डोळ्यांतून पाणी गळत होतें, तें तिला कळत नव्हतें—मन व्याकुळ झालें होतें—वेदनांनीं हैराण झालें होतें—कोणाजवळ कांहीं बोलण्यासारखें नव्हतें—

—मध्येंच ती उठली. बाहेर रात्रीचा अंदाज लागत नव्हता. चंद्राचें ढगाआडचें अस्पष्ट चांदणें पडलें होतें—ढग पडत झडत वर सरकत होते–आणि मध्येंच काळोख मिट्ट होत होता–मिट्ट काळोखांत पावसाच्या सरी कोसळत होत्या. तडाखे बसावे, तसे आंगठ्या एवढे शिंतोडे उडत होते–वरच्या बाजूची वळणेवळणें घेतलेली पाऊलवाट आपल्याला बोलावते आहेसें शालिनीला वाटत होतें.

—मग ती तशीच चालूं लागली. चार दोन पावलानाच ती चिंब भिजली होती. रात्र किती आहे कळत नव्हतें–तिच्या डोळ्यापुढें तिचा नवरा आजारीपणांत तिला बोलवित होता–मुलें खोकत होती. –शालिनी अडखळत होती–पाण्यांतून पावलें चालवतांना नकोसें होत होतें–रान किर्र होतें—

—नुकतें उजाडत आलें होतें–शालिनीनें बरीच वाट मागे केली होती–पाऊस वेड लागलेला माणूस हंसतो, तसा पडत होता–क्षितिजाकडे बघवत नव्हतें–मधला वहाळ दुथडी भरून वहात होता. लाल लाल पाणी आवेगानें चढत होतें–मधल्या मोठ्या धोंडीशीं टकरा देत होतें–शालिनी क्षणभर उभी राहिली–आजारी नवरा–खोकणारी मुलें–शालिनीकडे कांहीं मागत होती–तें देण्यासाठीं शालिनीनें खळखळत्या पाण्यांत पाऊल टाकलें–पण खळखळत्या लाल लाल पाण्याला त्या टीचभर कुडींतला धपापलेला जीव हवासा झाला.

•••











भारतीय समारंभाचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांतील मिष्टान्नें भोजन. त्यांत वेगवेगळ्या प्रकारच्या खमंग किंवा तिखटसर खाद्यपदार्थांचा अंतर्भाव असला तरी त्यामधलें प्रमुख गोड पक्वान्न सर्वांचा 'राजा' असतें. भोजनप्रसंगी गोड पक्वान्नाचा आग्रह हा आपल्याकडचा भोजन शिष्टाचार मानला जातो. त्याचें स्वरूप अतिशय खेळकर असतें. त्यांतला गोडवा गमतीचा असतो. आमंत्रितांचें तोंड गोड झाल्याशिवाय समारंभाची सांगता होत नाही.

भोजनांतील गोड पदार्थ तयार करण्यासाठीं सर्वप्रथम साखरच हवी. साखरेंत उत्साहवर्धकता व जीवनशक्ति

# गोडाचा आग्रह
## म्हणजे
# आग्रहांतील गोडवा

सामावलेली आहे. पाणी, हवा व सूर्यप्रकाश यांच्यामुळें तयार होणाऱ्या उंसापासून ती बनविली जाते. म्हणूनच ती स्फूर्ति आणि आरोग्यदायक आहे. निरोगी जीवनाची गोडी चाखण्यासाठीं अधिक साखर खा. आबालवृद्धांना उपयुक्त अशी ती मूलशक्ति आहे.

वालचंदनगर येथील साखर कारखाना साखरेच्या उत्पादनांत अग्रेसर आहे. वालचंदनगरची साखर शुद्ध, शुभ्र आणि स्फटिकासारखी चमकदार असते आणि खास साखरेसाठीं लागवड केलेल्या गोड रसाळ उंसापासून ती तयार होते.

## अधिक साखर खा







**वालचंदनगर इंडस्ट्रीज लिमिटेड, वालचंदनगर, पुणें जिल्हा**

WN/EMS-2/62 (M) TOM & BAY



*प्रस्तुत छोट्या छोट्या कथा भारतीय फौजेंतील एका सेवानिवृत्त अधिकाऱ्यानीं खास दीपावली-साठीं लिहिल्या आहेत. लेखकानें त्या स्वतः अनुभवल्या आहेत. आज भारताच्या उत्तर सीमेवर चीन आक्रमक पाउलें टाकीत आहे. पंचशील तुडवीत आहे. आपले जवान देशाचें रक्षण प्राणपणानें करीत आहेत. या पार्श्वभूमिवर प्रस्तुत चित्तथरारक सत्यकथा वाचतांना वाचकाला क्षणभर श्वासही रोधावा लागेल यांत शंका नाहीं—*

# युद्धस्य कथा

## १ वझिरिस्थान

वझिरिस्थान फाळणीच्या पूर्वीच्या हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील गोष्ट.

वझिरिस्थानमध्यें सरहद्दी पठाण आणि इंग्रज सरकार यांच्यामध्यें कधींच तडजोड झाली नाहीं. त्यामुळे तेथील पलटणींना २४ तास युद्धासाठीं सज्ज रहावें लागत असे, कारण पठाण केव्हां गोळीबार सुरू करतील याचा नेम नसे.

तेव्हां महिन्या–दोन महिन्यांतून हिंदुस्थानी आपापल्या सशस्त्र छावण्यांतून बाहेर पडून २–३ दिवस बाहेर राहून परत येत असे. ह्याचा मुख्य उद्देश लष्करी सत्तेच्या प्रदर्शनापलिकडे कांहीं नव्हता. पण प्रत्येक दौरा ही युद्धाची हाल-चाल समजली जात असे आणि त्यामध्यें एकदोन पठाण मारणें किंवा स्वतःचे एकदोन शिपाई जखमी होणें ही नहमीचीच गोष्ट होती.

अशीच एकदां एक फलटण बाहेर गेली होती. अशा वेळेला बहुतेक वाहातूक, खेचरांचे पाठीवरून करावी लागत असल्यामुळ एक ऑफिसर खास या कामाकरितां नियुक्त केला जात असे.

ह्या कथेचे नायक, एक कॅप्टन साहेब, त्या दिवशीं ह्या कामावरती होते. साधारणतः दुपारीं ११ वाजण्याचे सुमारास पुढें जाणारी फौज थांबली म्हणून कॅप्टन साहेबांनीं आपल्या हुकुमांतली १००–१५० खेचरें थांबविलीं. वझिरिस्थानच्या प्रदेशांत झाडें वगैरे दृष्टीस पडत नाहींत. तेव्हां उन्हापासून नाहीं तरी कमीत कमी गोळ्यापासून थोडातरी बचाव व्हावा म्हणून त्यांनीं सर्व खेचरें एक ठिकाणीं जमवून न ठेवतां, पांगून ठवण्याची खबरदारी घेतली होती.

शत्रूचा कोठें पत्ता नव्हता म्हणून कॅप्टन साहेब खेचरापासून ५०० गज पुढें एक उंचशीं जागा शोधून उघड्यावरच बसले. त्यांचा विश्वासू शरीररक्षकही त्यांचेजवळ बसला होता. कॅप्टन साहबांनी एक सिगरट शिलगा-विली व आपली दुर्बीण काढून समोर कांहीं गंमत दिसते कां म्हणून डोळ लावून बसले.

इतक्यांत एक आवाज झाला 'पिंग—' पाठोपाठ पुन्हां दुसरा आवाज. कॅप्टन साहे-बाच्या लक्षांत आलें कीं त्यांच्या बाजूस पठाण गोळ्या झाडीत आहत.

इतक्यांत त्यांचा शरीररक्षक म्हणतो, ' साहेब चला उठा पळा. कारण एक गोळी आताच दोन पायांमधून गली.'

कॅप्टन साहेब थंडपणे त्याच्याकडे न पहाता म्हणतात 'पीरखान अपनी टाँगे जरा और खोल दो, ताके अगर और गोली आयगी तो उसको जानेक लिये और रास्ता होगा' नंतर त्याचा एक हात धरून त्यला खालीं बसवून ठेवत ते पुढें म्हणाले 'वड्या, आपणच जर उठून पळूं लागलों तर काय गोंधळ माजेल, याची तुला कल्पना तरी आहे का? शिवाय अशी म्हण आहे कीं, येणाऱ्या गोळीवर आपलें नांव असल्याशिवाय ती गोळी कोणा-लाही लागत नाहीं. तेव्हां. उगीच काळजी कशाला.'

आणखी २–३ मिनिटें थांबून कॅप्टन उभे राहिले व त्यांनीं शिटी वाजवून त्यांच्या खेचरांना 'आगेकूच' करण्याचा हुकुम दिला.

× × ×

## २ औरंगाबाद

असे प्रसंग शांततेच्या काळांत सुद्धांही घडूं शकतात ह्याचें एक उदाहरण ऐका. औरंगा-बादच्या छावणींतील गोष्ट.

शांततेचे काळामध्यें फौजा लोकप्रवादा-प्रमाणें नुसत्या बसून माशा मारत नसतात. तर लढाईमध्यें त्यांना अधिक कार्यक्षम करण्याकरतां त्यांचें शिक्षण अखंड चालू असतें. ह्या शिक्षणाचेंच एक प्रमुख अंग म्हणजे हत्यारांचा योग्य उपयोग अथवा नेमबाजी ह्याकरितां त्यांना दरवर्षी एक ठरवून दिलेला नेमबाजीचा अभ्यासक्रम पुरा करावा लागतो. ह्यामध्येंच एक धडा किंवा परीक्षा त्वरित नेमबाजीची असे.

त्यामध्यें प्रत्येक शिपायाला एका मिनिटांत (६० सेकंदांत) लक्ष्यांवर १५ गोळ्या अचुक माराव्या लागत. ह्या परिक्षेच्या वेळेला एका ऑफिसरची बंदुका चालविणाऱ्या शिपायांवरती निरीक्षणाकरितां नियुक्ति केली जात असे. जर एखाद्या बंदुकीमध्यें यांत्रिक बिघाड झाल्याची ह्या ऑफिसरची खात्री झाली तर त्या शिपायास पुन्हां एकदां संधि द्यावयाचा अधिकार असे. बंदुका उडवितांना कधीं कधीं एक विशिष्ट यांत्रिक बिघाड होऊ शकतो. तो 'हाफ कॉक' किंवा गोळी उडविणारी पिन अर्धवट थांबणें असा आहे. घोडा पुरा दाब-लेला असल्यामुळें गोळी केव्हां उडल याचा नेम नसतो. त्यामुळे बंदुक लक्ष्यावरून दूर

करून एखाद्यावरती रोखली तर त्या माणसाला अतिशय धोका उत्पन्न होतो.

आमच्या बिनडोक डोग्रा राजारामचें, असेंच झालें. त्यानें सुमारें २–३ गोळ्या उडविल्या असतील आणि त्याच्या बंदुकीमध्यें बिघाड झाला. परीक्षेत नापास होण्याच्या धास्तीनें तो इतका गडबडून गेला कीं काय करतो ह्याचें त्याला भानच राहिलें नाहीं. बिघाड झाला आहे हे नियंत्रक ऑफिसरच्या नजरेस आणून देण्याकरितां त्यानें बंदुक लक्ष्यावरून काढून सरळ नियंत्रकाचे छातीजवळ आणली आणि बंदुकीचा घोडा पुन्हां पुन्हां दाबीत उद्गारला, ' साब रोक हो गया, सुसरी, चलती नहीं. '

नियंत्रक अधिकाऱ्यानें बिघाड 'हाफ कॉक' होता हें मागून पाहिलेंच होतें. गोळी केव्हां आरपार जाईल ह्याचा नेम नव्हता. एक क्षण डोळे मिटून व देवाचे स्मरण करून तो शांतपणें म्हणाला, ' हां, मैंने देखा है, लेकिन पहिले आपनी रायफल आपने सामने तो कर दो. ' सौ. चें कुंकु बळकट म्हणूनच त्यावेळेस त्यांचे छातीवर बंदुकीचा नेम असतांना गोळी उडाली नाहीं, ऐवढेंच.

× × ×

## ३ मी पूल कसा घेतला

दुसऱ्या महायुद्धाची गोष्ट. पुण्यास डेक्कन कॉलजमध्य लष्करी अधिकाऱ्यांचें युद्धाच्या डावपेचांचें शिक्षण पूर्ण करण्याकरितां एक खास शाळा उभारण्यांत आली होती. तेथें युद्धामध्यें येऊं शकणाऱ्या तऱ्हेतऱ्हेच्या घटनांवरती विद्यार्थी ऑफिसर्सना प्रमेयें देण्यांत येत असत. ह्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें, शिक्षकवर्गानें आपापसांत विचारविनिमय करून व सर्व तऱ्हेचीं शक्य असलेलीं उत्तरें लक्षात घेऊन, आधींच ठरविलेलीं असत.

एके दिवशीं आम्हांला, नदीपार शत्रूच्या ताब्यात असलेला पूल हल्ला करून हस्तगत कसा करावयाचा, असा प्रश्न दिला होता. शिक्षकानें काल्पनिक परिस्थिती, तसेंच शत्रूच्या व आमच्या सेनाबलाची माहिती व इतर सामुग्री आम्हांला दिली. प्रश्नाचा विचार करण्यास २० मिनिटें देण्यांत आली.

विद्यार्थी ७–८ चे गटामध्यें वाटले जात असत. आणि प्रत्येक गटानें आपली एकमताची योजना सांगावयाची असे. गटामधील एखाद्या ऑफिसरला गटाची योजना मान्य नसेल तर त्याला आपलें स्वतःचें उत्तरही सांगण्याचा पूर्ण अधिकार असे.

युद्धाच्या काळांत प्रत्येक ठिकाणीं लढाईचा प्रत्यक्ष अनुभव असलेले ऑफिसर्स नियुक्त करणें अशक्य असे. त्यामुळें कित्येक वेळा असे होत असे कीं शिक्षक पुस्तकी ज्ञानांत पारंगत तर विद्यार्थी प्रत्यक्ष लढाईच्या धकाधकींत तावूनसुलाखून निघालेले. आमचा शिक्षक असाच पुस्तकी ज्ञानांत तरबेज पण प्रत्यक्ष अनुभव नसलेला एक ऑफिसर होता. आमच्यापैकीं एक इंग्रज विद्यार्थी, फ्रान्स, क्रीट, लीबिया वगैरे रणक्षेत्रांतून तावूनसुलाखून निघालेला आणि साध्या शिपायापासून कॅप्टनच्या हुद्दावर स्वतःच्या पराक्रमानें चढलेला ऑफिसर होता.

२० मिनिटानंतर आम्ही पुन्हां जमा झालो. प्रत्येक गटानें आपापले उत्तर सादर केलें. वरील ऑफिसरनें आमच्या गटाच्या चर्चेंत मुळींच भाग घेतला नाहीं. तो म्हणाला, माझें उत्तर निराळेच आहे व तें मी स्वतंत्रपणें सांगेन. उत्तरामध्यें कोणी १५० माणसांची योजना केली होती तर कोणी तोफखान्याची मदत मागितली होती. अशा विविध उत्तरांचा पुष्कळ खल झाला. शिक्षकानें सांगितलें तुमचें उत्तर बव्हंशी बरोबर आहे. आमचीहि योजना अशीच आहे. असे म्हणून शिक्षक त्यांचें उत्तर सांगणार इतक्यांत हा ऑफिसर म्हणाला, 'माझी एक निराळीच योजना आहे ती तर आधी ऐका. ' शिक्षक म्हणाला, ' बरं बरं. सांगा–तुमच्याही अकलेचा एकदा प्रकाश पडूं द्या.' विद्यार्थी म्हणाला, तर मग ऐकाच 'माझी योजना अगदीं साधी आहे. तुम्ही काल्पनिक परिस्थितीमध्यें पुलावरती पहारा देणारे शत्रूचे दोन सैनिक आहेत असें सांगितलेत. नदीमध्यें छातीपेक्षां जास्त पाणी नाहीं आहे. ठीक आहे. मी माझ्या प्लटूनला ( सुमारें ३० माणसें ) शत्रूचें लक्ष वेधून घ्यावयास सांगून मी स्वतः शत्रूची नजर चुकवून आणि प्रत्येक हातांत एक एक पिस्तुल घेऊन नदी पार करीन. नंतर शत्रूच्या दोन्ही शिपायांवर दोन्ही पिस्तुलें रोखून आणि दोन चार शेलक्या शिव्या मोजून सांगेन कीं हत्यारें खाली टाका, नाहींतर प्राणास मुकाल. त्यांनीं हत्यारें खालीं टाकलेली पाहिल्याबरोबर माझे प्लटून द्रुतगतीने येऊन पुलाचें शत्रूच्या हल्ल्यापासून संरक्षण करील. झालें, 'पूल हस्तगत झाला. '

शिक्षक तुच्छतापूर्वक हसले व इतर विद्यार्थीही त्यामध्यें समाविष्ट झाले. शिक्षक म्हणाले, ' राव ! हा सगळा कल्पनेचा खेळ झाला. लढाईमध्यें असें कोठें होत असतें कां ! आम्हाला प्रत्यक्ष अंमलात येण्याजोगी योजना हवी आहे.'

विद्यार्थ्यानें मंदस्मित करीत उत्तर दिलें, ' कल्पनेचा खेळ किंवा काय हें कांहीं मला माहीत नाहीं. पण ह्याच युक्तीनें मी दोन वर्षांपूर्वी फ्रान्समध्यें एक पूल हस्तगत केला होता खरा. '

असें म्हणून त्यानें आपल्या छातीवरील ' मिलिटरी क्रॉस ' ( अप्रतिम शौर्य आणि साहस दर्शविणारें पदक ) च्या फितीकडे बोट दाखविलें.

शिक्षकांचा चेहेरा पहाण्यासारखा झाला होता, हे सांगणें नकोच.

●●●

*( या सर्व सत्यकथा असल्यानें अर्थातच मूळचीं नांवें बदलून काल्पनिक नांवें दिलेलीं आहेत. स्थळाचा निर्देश मात्र सत्य आहे. )*

## माझें सत्व

तुझ्या अधरींचे लिपस्टीक

जागे करिते कवित्व

तव कंचुकीच उभरीक

पहातसे माझे सत्व

—जयवंत गुजर





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# त्या दुष्कर्मांच्या पश्चात्तापानें मी जळत आहें






अहं च त्वानुयास्यामि : १९

## मीही तुझ्या मागून चालेन

**भा**रती युद्धांत पांडवांना जय मिळावा यासाठीं अमूक एक म्हणून प्रयत्न करावयाचा कृष्णानें बाकी ठेवला नाहीं. यांतील एक सर्वांत धाडसाचा आणि तेवढाच हृद्य प्रसंग म्हणजे कृष्णानें कर्णास पांडवांच्या पक्षास वळविण्याचा केलेला प्रयत्न होय. या प्रसंगाची गोडी काय वर्णावी ! द्रौपदीचा पक्ष लढणार तो कृष्णाच्या बळावर. दुर्योधनाचा पक्ष लढणार तो कर्णाच्या बळावर. कृष्णाचें बळ मुख्यतः युक्तीचें. कर्णाचें बळ मुख्यतः शस्त्राचें.

ही युक्ति या शक्तीला आपल्या पक्षास वळविण्यास प्रवृत्त झाली आहे. या भेटींत काय होणार आहे ! कुणाचा विजय होणार आहे ! काय हा राजकारणी पुरुष या सेनापतीला वांकविणार ! काय ! इथें द्रौपदीच्या पक्षाचा विजय होणार !

नाहीं. इथें कृष्णाचा विजय होणार नाहीं. कृष्णानें पांडवांबद्दलचें आपलें प्रेम, त्यांसाठी स्वार्थत्याग करावयाची आपली तयारी, आपली राजकारणपटुता, आपलें वाक्चातुर्य यांचा महोदधी कर्णाला त्यांत बुडविण्यासाठीं निर्माण केला आहे. पण आपल्या धीरोदात्त चारित्र्यानें कर्ण या महासागरावर हिमालया-इतका उंच उभा राहिला आहे. कर्णाच्या चरित्रावर हा एक प्रसंग जेवढा प्रकाश टाकतो तेवढा सबंध महाभारत टाकत नाहीं.

समेटाचा प्रयत्न विफल झाल्यावर परततांना कृष्ण कर्णाला आपल्या रथावर घेतो. त्याच्याशीं स्नेहानें बोलतां बोलतां, त्याची वेदपारंगतता, त्याचें धर्मशास्त्राचें ज्ञान याची स्तुती करत करत तो कर्णाचा जन्मवृत्तांत त्याला सांगतो आणि म्हणतो,

—अशा प्रकारें वेदांनुसार आणि धर्मानुसार तूं पांडूचा पुत्र आहेस. दुर्योधनाची मांडलिकी सोडून तूं माझ्याबरोबर चल. पांडूचा वडील मुलगा या नात्यानें हें साम्राज्य तुझें आहे. तूंच त्याचा सम्राट हो. तुझ्या पितृपक्षामध्यें प्रत्यक्ष पांडव आहेत. तुझ्या आईचें कुळ प्रत्यक्ष माझें कूळ आहे. तुला सूतपुत्र म्हणून दिवस कंठावयाची जरूर काय ? चल आपण असेंच जाऊं. मी तुझा हा कुलवृत्तांत धर्माला सांगतो. कर्णा पांचहि पांडव त्यावेळीं आदरानें तुझ्या चरणास स्पर्श करतील. द्रोपदीचे पुत्र आणि अभिमन्यु तुझ्या चरणावर डोकें ठेवतील. पांडवांच्या सहाय्यास आलेली सात अक्षौहिणी सेना आपल्या नायकांसह तुजपुढें लोटांगण घालील. देशोदेशीचे राजपुत्र आणि राजकन्या चक्रवर्ती








म्हणून तुझ्या मस्तकावर सुवर्ण कुंभातून अभिषेक करतील. धौम्यगुरू स्वतः तुझें अभि-षेक मंत्र म्हणतील. युद्धिष्ठिर तुझा युवराज म्हणुन तुजवर चवरी ढाळील. भीम तुझ्यावर छत्र धरील. सूतपुत्र म्हणून दिवस कंठणारा, तुझा सारथी होऊन अर्जुन तुझें घोडे हांकील. नकूल सहदेव धृष्टद्युम्न हे हात जोडून तुझ्या मागून चालतील. कर्णा एवढेंच काय पण प्रत्यक्ष मी सुद्धां तुझ्या मागून चालेन. चल. कर्णा, मजबरोबर चल. इथें मांडलिक सूतपुत्र म्हणून काय जीवन कंठीत आहेस. त्रिभुवनाचें अनिर्बंध साम्राज्य तुझें दार ठोठावीत आहे. चल. त्याचा उपभोग घे.

( थोडें विषयांतर करून सांगावयाचें म्हणजे काहीं महाभाग म्हणतात त्याप्रमाणें तुला द्रौपदींतही वांटा मिळेल असलें हीन प्रलोभन या ठिकाणीं कृष्णानें दाखविलेलें नाहीं. द्रौपदीच्या अरूची जास्तींत जास्त चाड नेहमीं कृष्णानेंच बाळगली आहे. असो. )

या प्रलोभनाला कर्णानें जें उत्तर दिलें आहे त्यांतील प्रत्येक वाक्य कर्णाच्या चारित्र्याच्या बहुमोल हिऱ्याला पैलू पाडणारें आहे. कर्ण म्हणतो,— कृष्णा, सौहार्द्र, प्रेम, मैत्री आणि हितेच्छा यांसाठीं तूं जें मला सांगितलेंस तें तुझ्या दृष्टीनें ठीकच आहे. मी कायद्यानें पंडूचा पुत्र आहे हें मी नाकबूल करूं शकत नाहीं. परंतु कुंतीनें माझा त्याग करतांना माझ्या जीवनाचें काय होईल याचा मुळींच विचार केलेला नाहीं. अशा परिस्थितींत अधिरत सूतानें मला प्रेमानें हृदयाशीं ऊब दिली आणि राधेनें मला मांडीवर घेतलें. मला स्तनाशीं लावतांच तिला पान्हा फुटला. माझें मलमूत्र साफ करण्याचें काम तिनेंच मायेनें केलें. ती भले हीन कुलीन असो. पण त्या माझ्या प्रेममूर्ती मातेच्या मुखांतील मातृत्वाचा मंगल घांस हिरावून घेणें आतां कोणालाही शक्य नाहीं. अधिरत मला आपला पुत्र मानीत आहे. मी त्याला माझा पिता मानीत आहे. माझे सारे संस्कार त्या माझ्या पित्यानें केले आहेत. भले तो सूत असो. त्याचाच पुत्र म्हणविण्यांत मला अभिमान आहे.

—सूत जातीच्या कन्या माझ्या बायका आहेत. त्यांनी मला गुणवान मुलें दिलीं आहेत त्यांचीं माझीं मनें भावबंधनानीं गुंतलीं आहेत. तूं त्रिभुवनाचें राज्य दिलेस तरी त्यासाठीं हे भावबंध मिथ्या करण्याचा मोह मला होणार नाहीं.

—कृष्णा दुर्योधन माझा अकृत्रिम मित्र आहे. आज त्याच्या स्नेहाचें फळ म्हणून तेरा वर्षें मी अकंटक राज्याचा उपभोग घेत आहे. केवळ माझ्याच आधारावर आज पांडवांना ठोकरण्याचे मनोबळ दुर्योधनाला प्राप्त झालें आहे. मी यावेळीं वध, बंधन, भय अथवा लोभ कशासाठींही दुर्योधनाची वंचना करणार नाहीं.

—तुझ्या सामर्थ्यावर माझा विश्वास आहे. तूं सांगतांच पांडव माझे दास होतील. पण यांत त्यांचा तरी काय लाभ आहे ? माझ्याशीं लढून तुझा स्नेही अर्जुन याला जी कीर्ती मिळेल ती माझा दास म्हणून मिळेल काय ?

—असो. आपले आतां जें बोलणें झालें तें षट्कर्णी न झालेलें बरें. युधिष्ठिराचें व माझें नातें काय आहे हे तूं त्याला सांगू नकोस. तें त्याला कळलें तर तो कोणत्याही

आत्माराम नीलकंठ

परिस्थितींत मी जिवंत असतां राज्यस्वीकार करणार नाहीं. अशा परिस्थितींत मी ते राज्य घेऊन दुर्योधनासच अर्पण करीन. त्यामुळें तूं ज्यांचे कल्याण करीत आहेस त्यांचें अनहितच होईल. तरी कुंती माझी माता आहे हें आणखी कोणास सांगूं नकोस.

—तुझ्या साक्षीनें आतां हा जो रणयज्ञ होणार आहे त्यांतून मी जिवंत पार पडलों तर तुझ्या दर्शनास मी येईन. तसें न झालें तर परलोकांत आपली भेट निश्चयानें होईल. तिथें आपण आजच्याचसारखे सौहार्द्रानें आणि स्नेहानें भेटूं, असें म्हणून आपल्या मामेभावास दृढ आलिंगन देऊन कर्ण रथावरून उतरला.

—'युद्धामध्यें तुमचा मी कोणत्या उपायानें वध करूं ? ' म्हणून भीष्म–द्रोण यांना विचारणारा युधिष्ठिर, आणि युधिष्ठिराचा समूळ नाश करण्याचें सूत्र हातांत आलें असतां तें वाऱ्यांवर उधळून देणारा कर्ण यांत अधिक धीरोदात्त कोण बरें ? इथें दुमताचा प्रश्नच नाहीं. युधिष्ठिराची काय असेल नसेल ती मिळमिळित गुणवत्ता कर्णाच्या गुणवत्तेच्या पादांगुलीचें नख धुवावयासही पुरी पडणार नाहीं. केवळ पामर असतील त्यांनाच हें न पटेल. कर्णाची नीतिमत्ता ही नरोवा कुंजरोवा असली डळमळित नव्हती. तें बावनकशी खणखणीत नाणें होतें. त्याचें महत्व पूर्ण पटलें असल्यानेंच कृष्णानें त्याची एवढी मनधरणी केली. पांडवांचा समूळ नाश करण्यास समर्थ असें महावीष त्यानें कर्णाच्या हातीं सोपविलें तें कृष्ण पागल होता नव्हे तर उत्तुंगोत्तुंग चारित्र्याचा व गुणवत्तेचा महामेरू असा कर्ण त्याचा गैरफायदा घेणार नाहीं असा कृष्णाचा पूर्ण विश्वास होता म्हणूनच.

महाभारत कर्णाच्या महत्तम तेजानें जागोजाग नुसतें प्रकाशून तेजाळलें आहे. कर्ण हाच निःसंशय सर्वश्रेष्ठ पांडव होय. कृष्ण आणि कर्ण यांच्या या भेटींत पहिल्या प्रतीचें राजकारण, पहिल्या प्रतीच्या चारित्र्यापुढें हतप्रभ झालें. या पहिल्या फेरींत द्रौपदीचा पक्ष पराभूत झाला. पुढें चंद्रगुप्ताच्यावेळीं कौटिल्यांच्या सर्व राजकारणानतरहि, राक्षसाचें चारित्र्य जसें निष्कलंक तेजानें तळपलें तशीच हीही गोष्ट झाली. आणि राक्षसाचें महात्म्य जसें कौटिल्यानें मुक्तकंठानें मान्य केलें तशाच कर्णाची महत्ता जाणून तिचें गुणग्रहण करण्याची श्रेष्ठ पात्रता कृष्णाचे ठायी असल्यानें ही परस्पर भेट ' न भूतो न भविष्यति ' अशी हृद्य झाली.

मीही तुझा दास होईन असें म्हणणारा कृष्ण आणि तूं आपल्या दास्यानें मला भूलवू शकणार नाहींस असें म्हणणारा कर्ण दोघेही धन्य होत. तोडीस तोड होत.

## राधेया हमाधिरथी, २०

## मी राधेय आहे, मी सूतपुत्र आहे

कर्णाला दुर्योधन पक्षाकडून फोडण्याचा कृष्णानें केलेला प्रयत्न व्यर्थ गेला तेव्हां कुंतीला फार दुःख झालें. तिनें शेवटीं ठरविलें कीं सख्या भावांत जें हें निर्णायक घोर युद्ध होणार आहे, तें टाळण्याचा आपण प्रयत्न करावा. आपण जाऊन कर्णास म्हणावें,

—कर्णा, तूं राधेचा नाहींस. तर कुंतीचा—माझा—पुत्र आहेस. तुझा पिता अधिरथ नाहीं. तुझा जन्म सूतकुलांत झालेला नाहीं. तूं माझा कानीन पुत्र आहेस. अर्जुन जेवढा पार्थ आहे तेवढाच तूंही पार्थ आहेस. तूं आपल्या मातेला आणि भावांना न ओळखतां आपल्या या शत्रूची सेवा करतोस हें योग्य नाहीं. धर्माची अशी

अनुक्रमणिका

आशा आहे कीं सज्जनांनी नेहमीं पिता, गुरुजन आणि माता यांना तृप्त टेवलें पाहिजे.

--तूं आणि अर्जुन हे जगांतील दोन श्रेष्ठ वीरबंधू आहांत. हें नातें ओळखून तुम्ही एक झालांत तर सारें जग तुमच्यापुढें नतमस्तक होईल. बलराम आणि कृष्ण या बंधूंप्रमाणें तुम्हीं शोभून दिसाल. तुम्ही एकमत आणि एकमन झालांत कीं जगांत तुम्हाला असाध्य असें काय राहील ? तूं माझ्या सर्व पुत्रात परम-श्रेष्ठ आणि ज्येष्ठ आहेस. आतां हें सूतपुत्राचें जीवन सोडून दे. आणि आपल्या बांधवांशीं एक हो.

असें सांगावयाचें ठरवून कुंती कर्णाकडे जावयास निघाली. मायलेकरांची, गाय वत्साची ती भेट. तिच्या भावबळामुळें कुंतीला यशाची खात्रीच वाटत होती. शिवाय याचकांची इच्छा पुरी करण्याची कर्णाची वेळ साधूनच ती निघाली होती. पुत्र दाता आणि माता याचक. मग तिला यशाची शंका कां यावी ? आपण काय बोलावयाचें हें ठरवित असतांना तिला अशी शकाही आली नाहीं. आपणांस बिनतोड वाटणाऱ्या युक्तिवादावर कर्णाकडे कांहीं उत्तर असेल. तो म्हणेल,

—तू जें पापपूर्ण वर्तन करून माझा त्याग केलास तें अत्यंत अनुचित कर्म झालें. माझा पाण्यांत झालेला त्याग हा यश आणि कीर्ती यांचा नाशक झाला. क्षत्रिय कुलामध्यें जन्म घेऊनही मी संस्कारास वंचित झालो. त्यामुळें जें अपमानास्पद जिणं मला जगावें लागलें त्याहून अधिक अहितकारक आणि कष्टदायक गोष्ट कोणताही शत्रू झाला म्हणून कोणती करणार आहे !

--या अवस्थेंतून ज्यानें मला हात दिला, जो माझी उपासना करून माझ्यापुढें मस्तक झुकवून, माझ्या आधारानें शत्रूना ठोकरीत आहे त्या दुर्योधनाचा त्याग मी आतां करूं शकेन असें तुला वाटते तरी कसें ? मला नौका मानून माझ्या आधारानें जो दुर्लंघ्य सागरावर आरूढला आहे, माझ्यावर भरंवसा ठेवून जो संकटाच्या पार होणार आहे त्याचा का मी विश्वासघातानें गळा कापूं ?

—आजवर दुर्योधनानें माझ्यावर उपकाराचा डोंगर रचला, त्याचा उतराई होण्याचा हाच अंवसर आहे. यावेळीं प्राण वेचूनही त्याचें रक्षण करणें हें माझें श्रेष्ठ कर्तव्य आहे. ज्यानें उत्तम तऱ्हेनें आपलें पालन पोषण करून आपल्या जीवनास अर्थ आणला त्याचा—संकट-कालीं त्याग करणें ही गोष्ट केवळ पापात्मा माणसाकडूनच होईल. अशा पापी माणसाला या जन्मीं सुख लाभणार नाहीच पण परजन्मीही लाभणार नाहीं.

—ज्यावेळीं माझ्यासाठीं तुला कांहीं करतां आलें असतें तेव्हां तुला माझी दया आली नाहीं. तेव्हां तुला तुझ्या मातृत्वाचा विसरा पडला. तेव्हां मातृधर्माला पारखी झालेली तूं आज मला पुत्रधर्माचा उपदेश करावयास प्रवृत्त झाली आहेस. त्यावेळीं स्वतःचें कर्तव्य विसरणारी तूं आज तुझ्या स्वार्थाचा प्रसंग उभा राहिला असतां, मला माझ्या कर्तव्यांचा उपदेश करीत आहेस.

--तुझी ही इच्छा सफल होणार नाहीं. मी तुला निश्चयानें सांगतों कीं माझी सर्व शक्ति एकवटून मी तुझ्या पुत्रांशीं युद्ध करणारच करणार. सज्जनोचित सदाचार आणि सदयता यांची माझी जी कल्पना आहे ती प्रमाणें दुर्योधनाचें रक्षण करणें हेंच माझें कर्तव्य आहे. त्यामुळें कितीही लाभदायक वा भाव-बलाढ्य प्रलोभनें तूं मजसमोर मांडलींस तरी मी त्यांचा स्वीकार करणार नाहीं.

प्रत्यक्ष जन्मदात्या मातेस–कुंतीस–कर्ण असें उत्तर देईल अशी कल्पनाही नसल्यानें कुंती कर्णाच्या भेटीस निघाली. कर्ण त्यावेळीं गंगानदीमध्यें स्नान करीत असून त्याच्या मुखांतून गंभीर ध्वननें वेदपाठ निघत होता. तो आपले दोन्ही बाहू उंच करून सूर्याची उपासना करीत होता.

त्यानें उपासना संपवून पाठ वळवितांच त्याची नजर कुंतीवर पडली. त्या महातेजस्वी बुद्धिमान माणसाच्या डोक्यांत प्रकाश पडावयास एक क्षणाचाही अवधी लागला नाहीं. नाना तऱ्हेच्या भावनांचा कल्लोळ उठून गोंधळून जाण्याचा हा प्रसंग. पण कर्ण एक क्षणार्धही गोंधळला नाहीं. कुंतीनें आपलें मुख उघडण्याच्या अगोदर विजेच्या तल्लखपणें तो तिला म्हणाला,

— राधा आणि अधिरथ सूत यांचा पुत्र असा मी कर्ण तुला वंदन करतों. तूं इथें कशासाठीं आली आहेस ?

आणि त्यानें कुंतीकडे पाहून स्मितहास्य केलें.

मी राधा आणि अधिरत सूत यांचा पुत्र आहे. हें अभिमानानें सांगण्यास याहून दुसरा कोणता प्रसंग उचित असता बरें ? कुंतीचें सारें वाक्पाटव उधळून लावण्याचें, तिला पूर्णपणें पराभूत करून तिचा उद्देश असफल करण्याचें सारें काम या उचित वेळीं बोललेल्या उचित शब्दांनीं झालें. तिच्या हातून घडलेल्या अनुचित कर्माचें जें म्हणून फळ कुंतीस मिळावयाचें तें त्या एकाच वाक्यानें यथास्थित मिळालें. शेवटीं कुंतीचा प्रस्ताव ऐकून त्याला कर्णानें पूर्वोक्त उत्तर दिले आणि शेवटीं तो म्हणाला,

— तूं सांगत आहेस यावर श्रद्धा ठेवण्याची आवश्यकता मला वाटत नाहीं. तुझ्यासारख्या स्त्रीच्या आज्ञेचें पालन करणें हा माझा धर्म आहे यावर माझा मुळींच विश्वास नाहीं. तरी पण एवढें कष्ट घेऊन तूं इथें आलीस, एवढी याचना केलीस, आणि तूं माझी जन्मदाती आहेस, तेव्हां तुझें हें येणें व्यर्थ होणें माझ्या कीर्तीस शोभून दिसणार नाहीं. तुझे पांच पुत्र जिवंत रहावे अशा आशेनें तूं इथें आली आहेस. ते जिवंत रहातील असें मी तुला वचन देतों. तुझ्याच सांगण्याप्रमाणें मी तुझा पुत्र आहे. तेव्हां अर्जुन मेला अगर मी मेलों तरी तुझे पांच पुत्र रहातीलच. तुझ्या इतर चार पुत्रांना माझ्यापासून उपसर्ग पोंचणार नाहीं.

असें कर्णाचें बोलणें ऐकून कुंतीचें हृदय भरून आलें आणि तिनें त्याला आलिंगन दिलें. विकट प्रसंगीही धैर्यापासून विचलीत न होणारा तो आपला पुत्र पाहून तिला कदाचित आनंद वाटला असेल. कदाचित आपले अभाप्सित असफल झाल्यामुळें तिला विषाद वाटला असेल. कदाचित आपल्या पूर्व कर्माचा पश्चाताप वाटला असेल. काय वाटलें तें सांगणें कठीण आहे. पण ती जेव्हां परत फिरली तेव्हां तिच्या मनांत कर्णाचें तें वाक्य थैमान घालीत असणार,

—'मी राधेय आहे मी अधिरथ सूताचा पुत्र आहे.'

## तेन तप्येऽह्यकर्मणा २१

## त्या दुष्कर्माच्या पश्चातापानें मी जळत आहे

श्रीकृष्ण सोडला तर महाभारतांत भीष्मानंतर दुसरा आदरणीय पुरुष कर्ण हा होय. कर्णाच्या चरित्रामध्यें उदात्त गुणांची एकामागून एक मालिकाच लागलेली आहे. कर्ण हा शूर होता. अर्जुनापेक्षां कांकणभर अधिक शूर होता. अर्जुनाकडून कर्णाचा वध घडला. त्यांत परिस्थिती कर्णाला प्रतिकूल होती आणि अर्जुनाला अनुकूल होती हें निर्विवाद आहे. परस्परांच्या तौलनिक शौर्याबद्दल आणि युद्धनैपुण्याबद्दल अर्जुनाचें कांहीही मत असलें तरी तो मनांतून कर्णाला दबून होता यांत शंका नाहीं. कृष्णाचें या बाबतींत मत तर उघडपणें कर्ण हा अधिक युद्धनिपुण आहे असेंच दिसतें. अर्जुनास देवावतार ठरविण्यास प्रवृत्त झालेल्या भाकडकथाकारांना घोषयात्रा आणि गोग्रहणप्रसंगीं जे असंभव पराक्रम वर्णिले आहेत ते केवळ थोतांड आहेत. जर उत्तरासारखा रड्या सारथी असतां तर एकटा अर्जुन एका क्षणांत भीष्म, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा, दुर्योधन, दुःशासन आणि दुसरे कोट्यवधी सैनिक यांचा पराभव करून त्यांचीं वस्त्रें हिसकण्यास समर्थ असता तर पुढें कृष्ण सारथी आणि सात अक्षौहिणी सेना बरोबर असतां मोठ्या कष्टानें एकेक वीर मारत अठरा दिवस घाम गाळण्याचा प्रसंग त्याच्यावर कदापि न येता. घोषयात्रा आणि गोग्रहण यांतील अर्जुनाचे पराक्रम म्हणजे सौतीच्या कविकल्पना होत. इतिहास भारती युद्धांत घडला तो- आणि या युद्धांतील कर्णाचा पराक्रम हा अधिक श्रेष्ठ आहे.

एवढेंच नव्हे तर कर्णानें हें जें उज्ज्वल यश संपादन केलें तें जन्मापासून अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत केलें. प्रयत्नवादी लोकांचें वेदवाक्य झालेले 'मदायत्तं तु पौरुषं' हे तेजाळ उद्गार ज्या कर्णाचे आहेत तो खरोखरच प्रातिकूल परिस्थितीवर विजय कसा मिळवावा याचा आदर्श आहे. अत्यंत मोक्याच्या अशा प्रत्येक क्षणीं त्याच्या हीन कुलाचा उल्लेख करण्यांत येऊन त्याची घोर मानखंडणा करण्यांत आली होती. पण तिनें यत्किंचितही खचून न जातां त्यानें परिस्थितीवर नेत्रदीपक विजय मिळविला.

कर्णाचें मोठेपण एवढ्यावरच संपत नाहीं. दुर्योधनाशी असलेली कर्णाची मैत्री हीही अतुलनीय आहे. या मैत्रीत बिघाड व्हावा म्हणून नाना प्रकारचे प्रयत्न करण्यांत आले. नाना प्रलोभनें दाखविण्यांत आलीं. प्रत्यक्ष श्रीकृष्णाच्या मुखांतून त्याला असें प्रलोभन दाखविण्यांत आलें कीं ही मैत्री तुटली तर मीही तुझ्यापुढें शीर वांकवीन. हें प्रलोभन यथातथा नाहीं. जगांत जीं प्रलोभनें येऊं शकतात त्यात हें फार अनिवार असें प्रलोभन आहे. पण कर्णानें त्याचा विचारही न करतां तें धुडकावून लावलें आहे. अशा प्रकारची मैत्री खरोखर त्रिभुवनवंद्य आहे.

उत्सवे व्यसने चैन विवाहे शत्रुविग्रहे ।
राजद्वारे स्मशानेच यस्तिष्ठति स बांधवाः ॥

यांत वर्णन केलेल्या आदर्श मैत्रीहून अधिक असें कर्णाच्या मैत्रींत कांहीं तरी आहे.

कर्णाचें औदार्य हेंही अनुपमेय होय. औदार्य प्राणावर बेतण्याच्या प्रसंग आला तरी कर्ण रेसभर मागे सरला नाहीं. पांच पुत्र जिवंत ठेवण्याचें कुंतीस दिलेलें उदार वचन त्यानें शब्दशः पाळलें. ज्याशिवाय आपला मृत्यू अटळ आहे हें माहीत होतें अशीं आपलीं अभेद्य रणसाधनें त्यानें खुशाल दान देऊन टाकलीं.

कर्णाचें हें उदात्त चरित्र खरोखर महाकाव्याचा विषय होण्याजोगें आहे. आणि त्यानें अनेकांना स्फूर्ती दिलेली आहे. भीमार्जुनांनीं जें शौर्य दाखविलें तें स्वार्थासाठीं दाखविलें. उलट कर्णानें जें शौर्य दाखविलें तें कृष्णानें पुढे उभा केलेला स्वार्थ लाथाडून दाखविलें. तत्त्वासाठीं दाखविलें. त्याची उदात्तता आगळीच होय. कर्णाच्या दर्शनानें डोळे दिपले म्हणजे पुष्कळदां भीष्म आणि कृष्ण यांचाही विसर पडण्याचा प्रसंग येतो. कर्णाच्या चरित्राला एक गालबोट लागलें

अनुक्रमणिका







नसतें तर त्यानें भीष्म आणि कृष्ण यांना मागें सारलेंही असतें— पण !

पण कर्णाच्या हातून एकदां अनुचित वर्तन घडलें आणि त्याच्या चरित्र्यचंद्रास कलंक लागला. आपणास दासपुत्र म्हणून नाकें मुरडून ज्या पांडवांना द्रौपदीनें वरलें त्या पांडवांना दासपुत्रच नव्हे तर प्रत्यक्ष दास बनवून कर्णानें त्या मानखंडनेचा बदला घेतला. द्यूतसभेंत मोठमोठे शिष्ट अगतिक झाले तेव्हां पांडव हे दास झाले हा पक्ष कर्णानें नेटानें उचलून धरला. द्रौपदीच्या बुद्धिमत्तेने आणि तेजानें सारी सभा जिंकली जाण्याचा संभव आहे असें दिसतांच त्यानें तिच्यावरहि अत्यंत निर्घृण असा प्रहार करावया मागें पुढें पाहिलें नाहीं. द्रौपदी निश्चयानें दासी झाली हें प्रतिपादन त्यानें केलें. इथपर्यंत सारें ठीक होतें. द्रौपदी दासी झाल्यावर त्याच्या अपमानाची भरपाई झाली होती. बाकी शिल्लक उरली नव्हती. परंतु दासीशीहि सौजन्यानें वागण्यांत अधिक गौरव आहे हें तो विसरला. द्रौपदीला पार धुळीला मिळविण्यासाठीं त्यानें एक पाऊल आणखीं पुढें टाकलें. तो म्हणाला,

—पांच पतींना शरीरदान करणारी ही स्त्री वेदांच्या दृष्टीनें वेश्या आहे. वेश्या भरसभेंत नग्न केली गेली तरी त्यांत गैर नाहीं दुःशासना, खेंच तिचें वस्त्र खेंच.

द्रौपदीला नग्न करण्याची कर्णानें दिलेली आज्ञा हाच तो कलंक. हेंच तें पाप. वेदार्थाची ओढाताण करून द्रौपदी ही वेश्या बनणें शक्य असलें तरी वेश्येला सभेंत नग्न केलेंच पाहिजे असा कुठच्याहि वेदाचा दंडक नाहीं. आणि दंडक असलाच तरी तो पाळण्यांत उदात्ततेचा गौरव नाहीं याचें भान कर्णास राहिलें नाहीं-

कर्णानें हें महापाप केलें. तें घडून गेल्यावर त्याला त्याची जाणीव झाली. त्यानें त्याच सभेंत द्रौपदीचा श्रेष्ठपणा तर मान्य केलाच पण आपल्या या दुष्कर्माचा त्याला आमरण पश्चाताप होत राहिला.

जेव्हां कृष्ण आणि कर्ण याचीं मनमोकळी भेट झाली तेव्हां कृष्णानें या विषयास स्पर्शसुद्धां केला नसतां कर्णानें आपणहून आपल्या कुकर्माची दिलगिरी प्रदर्शित केली आणि शेवटीं तो म्हणाला त्या दुष्कर्माच्या पश्चात्तापानें मी आज जळत आहे.

एक भीष्म सोडला तर ज्यानें दुष्कर्म केलेलें नाहीं असा पुरुष महाभारतांतील मुख्य पुरुषांत शोधून सांपडणार नाहीं-पण ज्याला आपल्या दुष्कर्माचा पश्चात्ताप झालेला आहे आणि तो ज्यानें दिलगिरीपूर्वक बोलून दाखविला आहे असा पुरुष एकटा कर्णच होय. युधिष्ठिरासारख्या माणसास आपल्या एकाही कर्माचा पश्चात्ताप होऊं नये, अर्जुनासारख्यास आपण एकलव्यास नाहक जीवनांतून उठविलें याची जाणीवही राहूं नये या पार्श्वभूमीवर कर्णाच्या पश्चात्तापाचा विचार करावयास हवा. दुष्कृतींची जाणीव आणि पश्चात्ताप होणें हें जर चारित्र्याच्या गौरवाचें लक्षण असेल तर त्या गौरवास कर्ण पात्र आहे.

द्रौपदीनें कुलीनतच्या अभिमानांत चाल्तां चालतां कर्णाचा जो अपमान केला त्यानें कर्णाचा झालेला संताप जसे तेजस्वी आणि मनस्वी लोकच जाणूं शकतात तशीच द्रौपदीच्या विटंबनेबद्दल कर्णानें प्रकट केलेल्या दिलगिरीची उदात्तता कृष्णासारखे दिलदार लोकच जाणू शकतात. म्हणून ती त्यांच्याकडे व्यक्त केली जाते. ते येरागबाळ्याचें काम नाहीं.

(क्रमशः) •••





अनुक्रमणिका



तुमच्या
शर्टांना
टिनोपालची
शुभ्रता आणा
ते झगझगीत चमकदार
पांढरेशुभ्र बनवा






धोण्याशा
टिनोपाल नें
सफेद कपडे सर्वांत अत्यंत
शुभ्र बनतात














*भारतीय क्रांतिकारकांत जाज्वल्य देशभक्ति आणि असीम देहदंड सहन करणारे म्हणून स्वा. वी. विं. दा. सावरकर प्रख्यात आहेत. स्वातंत्र्यवीरांच्या साहित्यांतून काळाच्या पुढे पहाण्याची अचूक नजर दिसून येते. प्रस्तूतचा लेख चीननें भारतावर केलेलें निर्घृण आक्रमण लक्षांत घेतां वाचनीय तर वाटेलच पण स्फूर्तिदायकहि ठरेल—*

# वैभवशाली भारत

जें राष्ट्र आज ह्या आसिंधुसिंधु भारतवर्षाला व्यापून हिंदू म्हणून निवसत आहे त्याचा मूलारंभ वैदिक काळांतील सप्तसिंधु' ह्या नांवानें प्रख्यातलेल्या राष्ट्रापासून झाला. त्या आमच्या अत्यंत प्राचीन सप्तसिंधु ह्या संस्कृत अभिधेचेंच हिंदू हे प्राकृत रूप होय. वैदिक काळांतील त्या सप्तसिंधु राष्ट्रांतील वीरांचें खड्ग नि द्रष्ट्यांची स्फूर्ति, ते ज्या प्रज्वलित यज्ञाग्नीस आराधीत असत त्याच्या ज्वालासारखींच दैदीप्यमान नि दुर्धर्ष होती, त्यांच्या काळांतील त्यांच्या शत्रूंवर विजयामागून विजय मिळवीत त्यांचीं सैन्यें, राज्यें नि संस्कृति सरस्वतीपासून ब्रह्मावर्तास, ब्रह्मावर्तापासून मगधारा, प्रयागास नी काशीस, मथुरेस द्वारकेस–पूर्व समुद्रापासून तों पश्चिम समुद्रापर्यंत अप्रतिहपणें कशीं विस्तारत गेलीं; विंध्य ओलांडून सह्य ओलांडून अंतीं दक्षिण समुद्र त्यांनी कसा गांठला, अनादि घनदाट महारण्यें कापून छाटून प्रदेशाच्या प्रदेश त्यांनीं कसे वसविलें, नांगरलें, पेरले, सहस्रावधि नगरें नि महानगरें कशीं उभारलीं, वाटेंत भेटलीं तीं तीं विभिन्न जानपदें नि विपक्षीय संस्कृति कांहीं सामावून घेतल्या, कांहीं पचवून टाकल्या, कांहीं कशा मातीस मिळविल्या, कित्येक रावणांचीं दाही दाही शिरें कशीं छाटून टाकलीं. कित्येक





अनुक्रमणिका

दस्युंचे सहस्र सहस्र बाहू कसे तोडून टाकले, कित्येक बळी महाबळींना कसे पातळीं घातले, काव्यशास्त्र, व्याकरण, शिल्प, धर्म, योग, तत्त्वज्ञान प्रभृति भौतिक नि आत्मिक प्रगतीतहि केवढें महनीय स्थान त्यांनीं पटकाविलें, तें कांहीं आतां नव्यानें सांगावयास हवें किंवा पुराव्यानें सिद्धावयास पाहिजे असें नाहीं! डॉ. आंबेडकर एका निबंधांत म्हणतात कीं,

" That the Hindu religion was once a missionary religion must be admitted. It would not have spread over the face of Inaid if it was not a missionary religion!" ' हिंदुधर्म हा प्रचारशील धर्म होता ह्यांत शंकाच नाहीं; नाहीं तर ह्या साऱ्या भारतवर्षास तो असा व्यापून टाकताच ना!' हिन्दुराष्ट्राच्या धार्मिक दिग्विजयासंबंधींहि डॉ. आंबेडकरांनींच जें वरील एकमेव प्रमाण पर्याप्त मानलें आहे तेंच वैदिक नि पौराणिक कालखंडां-तील सांस्कृतिक नि राजकीय दिग्विजयासंबंधींहि निर्णायक धरलें पाहिजे. वैदिक सप्तसिंधूंचें राष्ट्र पंचनदापासून ब्रह्मावर्तांतून आर्यावर्तांत नि आर्यावर्तांतून ह्या 'उत्तरं यत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणं। तं वर्षं भारतं नाम भारती यत्र संततिः।' अशा उभ्या भारतवर्षांत आपली संस्कृति नि साम्राज्य फैलावीत जात जात ज्याचा पुरोहित आणि सेनानी इंद्र आहे अशा आपल्या राष्ट्राचें वर्चस्व ज्या काळच्या जगांत अप्रतिहतपणें गाजवीत राहिले होते त्या काळाविषयीं तरी 'Hindus' has been a life of Continuous defeat असें म्हणण्याची कोणाची छाती आहे? त्या हिंदूंच्या दिग्विजयी वैदिक, रामायणिक, महाभारतीय काळाचें वर्णन करावयाचें तर असेंच केलें पाहिजे कीं, ' In the Vaidic and Pauranic period the life of the Hindus had been a life of one continuous triumph, of invincible indep ndenec, astonishing progress and unchnlleugable superiority. "

आणि तो वैदिक नि पौराणिक कालखंडहि कांहीं लहान सहान नव्हता; शतकांनीं न मोजतां सहस्रकांनीं मोजला जावा इतका सुदीर्घ! **त्या काळचीं समकालीन राष्ट्रें आपलें सारें जीवनकार्य नि जीवन संपवून मरून अस्थिशेष वा इष्टिकाशेष वा नामशेषही होऊन गेलीं!**

**ग्रीकांची स्वारी आणि शेवटीं हिंदूंनीं त्यांची उडविलेली धुळधाणः**—इतिहासकालचें प्रारंभीच शिकंदरनें इ. स. पू. ३२६ वे वर्षीं हिंदुस्थानावर स्वारी केली. वैदिक नि पौराणिक कालांतील दैत्य-दानव, असुरनाग, यक्षराक्षसादि परकीय शत्रूंशीं दोन हात करून हिंदूंनीं त्यांचा धुव्वा उडवून दिला आणि त्या कित्येकांच्या वारसाप्रमाणेंच सर्वांच्या वाराण्याला जेवून ते मोकळे झाले. त्यानंतरचा काळ तो इति-हास काळ. त्याच्या आरंभींच पृथ्वी सर्व पादाक्रांत करूं निघालेल्या ग्रीकां-सारख्या बलाढ्य शत्रूशीं सामना देण्याचा प्रसंग ह्या शिकंदराच्या स्वारी-मुळें त्यांना आला. पण ग्रीस देशांतून निघाल्यानंतर सिरिया, इराण प्रभृति देश नि देश पादाक्रांत करीत आलेल्या शिकंदराच्या दिग्विजयाची लाट ह्या हिंदुस्थानच्या हिमालयीन तटावर आदळतांच फुटून गेली! परंतु भारतविजेता म्हणवून घेण्याची शिकंदराची खुमखुम पंचनद ओलांडतो न ओलांडतो तोंच जिरून गेली! त्यानें पौरसाचा पराभव केला. पण तो इतक्या निकराच्या लढाईनंतरच कीं, ग्रीक सैन्याचें त्या पुढच्या मगध साम्राज्यांशीं गांठ घालण्याचें धैर्यच कांहीं अंशीं तरी खचून जावें! व्यास नदी ओलांडून त्या मगध साम्राज्याशीं गांठ घालण्याचें शिकंदराच्या सैन्यानें साफ नाकारलें, बंड केलें आणि शिकं-दराला परत फिरणें भाग पडलें. ह्या बंडास इतरहि कांहीं कारणें असलीं तरी जर का मगध साम्राज्यामध्यें शिकंदरास इराणाप्रमाणेंच मोकळें रान सांपडण्याचा संभव असता नि चालतां चालतां जिंकता येण्याइतकें तें दुर्बळ आहेसें त्या ग्रीक सैन्यास वाटलें असतें तर ते मगधच्या राज-वाड्यांत दोन चार चमचमीत भोजन समारंभ उरकल्यावांचून थोडेंच जाते! आणि परत फिरलें ते तरीं कसें तर पावलागणिक हिंदूंच्या लहान-मोठ्या गणराज्यांनीं केलेल्या लांडगे तोडीनें भीक नको पण कुत्रा आवर असे संत्रस्त होत होत! त्यांतहि क्षुद्रकमालव येथील हिंदूंच्या गण-राज्यांनीं शिकंदराला असा उपद्रव दिला कीं ग्रीक इतिहासकारांना देखील त्यांच्या शौर्याची वाखाणणी केल्यावांचून राहवेना. त्या दिग्जेत्या शिकंदराला हिंदुवीरांनीं एकदां तर व्यक्तिशः घायाळ करून समरांगणांत पाडला! हिंदूंच्या खड्गाघातानें बेशुद्ध नि रक्तबंबाळ होऊन पडलेल्या आपल्या त्या सम्राटाला मोठ्या कडीनिकडीनें बचावून यावनी सैन्यानें रणांतून त्या दिवशीं वेळींच उचलून नेलें म्हणून शिकंदर हिंदुस्थानांतून जिवंतपणीं परत तरी जाऊं शकला!

**शिकंदर दिग्विजयी होताच होता. पण तो भारतविजेता नव्हताच नव्हता!** पंचनदाच्या पुढें पाऊलदेखील तो टाकूं शकला नाहीं. दक्षिण समुद्रापर्यंत पसरलेल्या हिंदुराष्ट्रसंघाचा केंस देखील तो वांकडा करूं शकला नाहीं. दक्षिणेंत तर तो आला ही बातमी पोंचण्याचें आधीं, सिंधु ओलांडून तो आला तसा परतलाही होता! एक पंजाब तेवढा त्यानें आपल्या साम्राज्यास जोडला, (इ. स. पू. ३२५ त!) पण हिंदूंनीं ग्रीकांच्या अधिकाऱ्यांस पिटाळून लावून तो लगोलग परत घेतला (इ. स. ३२२ चे आंत)! अवघ्या चार वर्षांचें आंत जगतांतील त्या काळच्या बलाढ्य शत्रूचा पाय हिंदूंनीं हिंदुस्थानांत रोवला जातां जातांच असा उखडून टाकला!

पण इतक्यावरच थांबले नाहीं. हिंदूंचा हा विजय अप्रत्यक्ष विरोधाचा यावनी सैन्याशीं समोरासमोर खड्गाला खड्ग भिडवून कांहीं हिंदूंनीं त्यांना धूळ चारली नाहीं, असे कोणी वावदूत म्हणूच लागला तर त्यांचेहि तोंड बंद पाडणारी घटना ग्रीकांच्या इ. स. पू. ३२२ मधील वरील उच्चाटनामागोमागच घडून आली. ग्रीकांसारख्या बलाढ्य शत्रूंशीं सामना देण्यास बदललेल्या परिस्थितींत जें अवश्य तें तें नवें शिकून, तें तें जुनें टाकून, चाणक्याच्या अलौकिक प्रतिभेनें नि चंद्रगुप्त मौर्याच्या पराक्रमानें मगधांत मोठी राज्यक्रांति घडवून आणली. हिंदुसाम्राज्याच्या महारथाचीं सूत्रें त्यांच्या हातीं येतांच ग्रीकांच्या हातांतून हिंदूंनीं पंजाब लगोलग हिसकून घेतला असें पहातांच शिकंदराचा प्रबळ सेनापती सेल्यूकस हा यावनी सैन्यासह पंचनदावर इ. स. पू. ३०५ च्या सुमारास पुन्हा चालून आला. तेव्हां सम्राट चन्द्रगुप्तानें त्याला रणांगणांत गांठून **अभिमुख समरांत ग्रीकांचा इतका पूर्ण पराभव केला कीं पंचनदच नव्हे तर अफगाणिस्थान नी बलुचिस्थान हे प्रांतही विजयी हिंदुराष्ट्रास देऊन वरती अहेर म्हणून ग्रीक सम्राट सेल्यूकसनें आपली कन्याही हिंदुसम्राट चन्द्रगुप्ताला अर्पिली!** इ. स.पू. ३०५ च्या आधीं हिंदूंनी ग्रीक राष्ट्राचा पुरता माड करून अवघ्या वीस वर्षांचें आंत त्यांची धुळधाण उडवून दिला आणि **हिंदुकुश पर्वता-वर हिंदुसाम्राज्याचा ध्वज नेऊन रोवला!** पुढें दोनशें वर्षांपर्यंत हिंदुराष्ट्राकडे पुन्हा डोळा वर करून पहाण्याची ग्रीकांची छाती **झाली**





## चोरबाजारांतील चीजा (चालू)

—शामराव ओक

पंचवीस वर्षांपूर्वी ‘ प्रतिभे ’मधून प्रसिद्ध झालेल्या शामरावांच्या ‘चोरबाजारांतील चीजा ’ जाणते वाचक अजून विसरले नसतील. तोच मिस्किलपणा—तीच विनोदाची—उपरोधाची धार त्याच जोमानें आजहि त्यांच्या लिखाणांत आढळेल. ‘दीपावली ’च्या पुढील अंकापासून वाचकांस तों अनुभवा-बयास मिळेल.

नाहीं हेंहि ध्यानांत ठेविलें पाहिजे. शिकंदरानें जिंकलेलीं आशिया खडांतलीं सारीं राष्ट्रें ग्रीकांच्या हातीं राहून तेथें त्यांचीं चिरस्थायी राज्यें नांदलीं. त्यांच्या दिग्विजयाचे दांत एका हिंदुस्थाननेंच काय ते पाडले ! त्या काळच्या जगांतील साम्राज्यामध्यें चन्द्रगुप्त–बिंबसार अशोकादि मौर्यसम्राटांचें हिंदुसाम्राज्य सर्वतोपरी श्रेष्ठ होतें कीं नाहीं, स्वतंत्र होतें कीं नाहीं, प्रबळ होतें कीं नाहीं तें परस्परें चन्द्रगुप्ताचे राजधानींत असलेला ग्रीकांचा राजदूत जो मेग्यास्थेनिस त्यालाच विचारा !! त्या ‘ देवनाम् प्रिय ’ अशोकाच्या यशःस्तंभाना विचारा !! ह्या पुराव्याला समोर ठेविलें असतां ‘ हिंदूचें जीवन सतत शरणांगतीचें नि अखंड पराभवाचें होतें ’ असें कोणता पिशुन म्हणूं धजेल !

सेल्यूकसला चंद्रगुप्तानें पराभविल्यानंतर कोणाहि अहिंदूस भारतवर्षाची सीमा उल्लंघिण्याचें धाडस अव्याहत दीडशें वर्षेपर्यंत झालें नाहीं. मौर्यवंशाचे बौद्ध राजे पुढें दुबळे झालेलें पाहातांच आशियांतील ग्रीक राजांनीं हिंदुस्थानावर दुसरें मोठें आक्रमण करण्याचा घाट घातला, तेव्हां मागें नंदवंशीय असेच दुबळे झाल्यामुळें चाणक्य–चंद्रगुप्तांनीं त्या नंदवंशीय सम्राटास ठार मारून हिंदु साम्राज्याची सत्ता जशी आपल्या हातीं घेतली तसाच वैदिक धर्माचा निस्सीम अभिमानी असलेल्या **सेनापति पुष्यमित्रानें** त्या दुबळ्या बौद्ध बृहद्रथ राजास मारून यावेळ हि साम्राज्यसत्ता आपल्या पराक्रमी हातीं घेतली. मगधांत ही राज्यक्रांती होत आहे तोंच ग्रीक राजा मीनांदर हा सिंधु ओलांडून पंचनंदांत इ. स. पूर्वी १८० चे सुमारास घुसला. ग्रीकांनीं तडाक्यासरशीं चाल करून सांकेत घेतलें आणि ते मथुरेपर्यंत चालून आले, तोंच सम्राट पुष्यमित्रानें तेथें त्यांना गांठलें. रणामागून रणामध्यें हिंदु सैन्यानें ग्रीकांस चोप दिला. मागे रेटीत रेटीत शेवटीं पुष्यमित्रानें मीनांदरचा इतका धुव्वा उडविला कीं त्याला धांवपळ करीत सिंधुपार होतां होतांच नाकींनऊ आले. ह्या विजयाची घोषणा करण्यासाठीं हिंदुसम्राट पुष्यमित्र ह्यानें मोठा अश्वमेध यज्ञ आरंभून आपला यज्ञीय विजयाश्व संचारार्थ सोडला. त्यास कांहीं ग्रीक राजांनीं अडवितांच पुष्यमित्राचा पुत्र जो युवराज अग्निमित्र यानें त्यांचाहि मोड केला, हिंदूंच्या अप्रतिरथ पराक्रमाची द्वाही अशी देशोदेशीं गाजवीत तो विजयाश्व परल्यानंतर पुष्यमित्र सम्राटानें आपला अश्वमेध यज्ञ पुरा केला.

मीनांदराच्या ह्या स्वारीविषयीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं मथुरेपर्यंतचा उत्तर पश्चिमेचा एक प्रांत सोडला तर बाकीच्या साऱ्या दक्षिणोत्तर अशा विस्तृत भारतवर्षाशीं शिकंदराच्या स्वारीप्रमाणें ह्या स्वारीचाही लवलेश संबंध आला नाहीं. आणि त्या परशत्रूंना आंत येतांयेतांच हिंदूनीं असे लागोपाठ पिटाळून लावले.

सम्राट पुष्यमित्राच्या वरील दिग्विजयानंतर हिंदुराष्ट्राला अहिंदु आक्रमणाशीं तोंड देण्याचा म्हणण्यासारखा प्रसंग शंभर वर्षे तरी कांहीं आला नाही. त्यानंतर साऱ्या आशियाला हादरून टाकणाऱ्या शक आणि यूची ह्याच्या टोळधाडी जेव्हां उठल्या तेव्हां इ. सनाच्या पहिल्या शतकांत हिंदुराष्ट्रालाहि त्यांचा प्रचंड धक्का बसून हिंदूंच्या इतिहासाला एक तात्कालिक लांछन लागावें इतका आमचा पराभव झाला. शक आणि यूची यांच्या टोळधाडीनें आशियाच्या साऱ्याच मोठमोठ्या साम्राज्यांची दुर्दशा करून सोडली हें जरी, खरें, तरीहि त्या टोळधाडी गांधारापर्यंत पोंचण्याचे आधींच सिंधु नदीच्या सीमेवर प्रचंड प्रतिकार करण्यास समर्थ असें हिंदु सैन्य नेऊन उभें करणारी एकही संघटित शक्ति हिंदुराष्ट्रसंघांत त्या वेळीं येऊं शकली नाहीं. आणि अंतस्थ यादवींत तो सारा राष्ट्रसंघ गुंतून ती टोळधाड उज्जयिनीपर्यंत येऊन पोंचली तरी तिचा प्रतिकार करण्यास समर्थ झाला नाहीं. ही ढिलाई त्या काळच्या हिंदुराष्ट्राच्या इतिहासास कलंक फाशीत आहे हें कांहीं नाकारतां यावयाचें नाहीं. ग्रीकांच्या आक्रमक सैन्यांना हिंदुस्थानांत घुसतांच जसें एका दशकाचें आंतच चंद्रगुप्तानें वा पुष्यमित्रानें पुन्हां सिंधुपार पिटाळून लावलें तसें या शक–यूचींचें पारिपत्य लागोपाठ कोणी करूं शकला नाहीं. उलट काश्मीर, पंजाब, सिंध, काठेवाड प्रभृति प्रांतांत त्यांची राजसत्ता चिरस्थायीपणें स्थापन्ली जाऊन त्या अहिंदु राजवंशानीं उज्जयिनी प्रभृति दोन-तीन राजधान्यांतून दोनअडीच शतकें तरी राज्य करूं शकावें ही वस्तुस्थिति त्या कालखंडापुरती लज्जास्पद समजली पाहिजे.

परंतु असा तात्कालिक पराभव होणें आणि दोनचार प्रांत शत्रुचे हातीं पडणें निराळें आणि तो अत्यांशीं नि अल्पकालिक पराभव झाला म्हणून त्या यच्चावत् जीवनच ‘ सतत पराभवाचेंच काय म्हणून तें होय ’ असें अप्रमाण नि आचरट विधान करणें हें निराळे !

विषप्रयोगाच्या संकटांत बलिष्ठ भीमसेनही मूर्च्छित होऊन डोहांत बुडाले, त्यावेळीं कित्येक नागांनीं त्यांना विळखून टाकलें कित्येक वेडकें त्यांच्या डोक्यावर नाचलीं, पण त्या नागांच्या विषासहि पडवून त्या विषप्रयोगाच्या बेशुद्धींतूनहि ते सावरले, आणि त्या विषप्रयोगाचा सूड त्या दुःशासनाचा कंठनाळ फोडून घेते झालें, हेंच भिमाचें भीमपण ! पण तें विसरून आणि त्या तात्कालीन बेशुद्धीसच भीमसेनाचे संबंध जीवन समजून भीमाचें जीवन म्हणजे एक अखंड बेशुद्धीच होती, जन्मभर त्या दुबळ्याचे डोकींवर बेडकें नाचलीं, असें जर कोणी ट्रांवट्रांव करण्यास धजेल तर तें कोणी फुगीर बेडूकच काय ते !

शक–यूचींच्या भारतावर कोसळलेल्या त्या आपत्तीची गोष्टहि तशीच आहे. गुजराथपर्यंत त्याची सत्ता चालू होती. भारतीयांस त्याचा यशस्वी प्रतिकार करवला नाहीं. पण त्या अवधींत आंध्रीय हिंदुसम्राटांनी आपली शक्ति एकवटून शक लोक नर्मदा उतरून येतात तोंच त्यांची गांठ घेतली. प्रथम त्यांना नर्मदेपार हुसकलें आणि मग आंध्राचा प्रबल नृपति गौतमी पुत्र यानें शकांच्या हातून उत्तरेकडील प्रांतामागून प्रांत परत घेत घेत शेवटीं शकांचा राजा प्रत्यक्ष नहपान क्षहराट यास तुमुल संग्रामांत पराभवून ठार मारिलें. त्या हिंदु विजेत्याची आई गौतमी हिला आपल्या वीरपुत्रानें अहिंदूंचा असा सूड उगवल्याची वार्ता कळतांच इतका परम हर्ष झाला कीं, त्याची स्मृति कालें येथील एका शिलालेखांत नित्याची कोरून ठेविली गेली ! इ. स. १०६ ते इ. स. १३० पर्यंत ह्या प्रतापी गौतमीपुत्रानें

राज्य केल्यानंतर त्यांचा पुत्र राज्यावर बसला तोंच प्रख्यात शककर्ता शालिवाहन हा होय! त्यानें उज्जयिनीचा दुसरा पराक्रमी राजा जो रुद्रदामन त्याचाहि पराभव केला. इ. स. ३२० चे संधीस वैदिक धर्माभिमानी गुप्तवंशाच्या हातीं जेव्हां उत्तरेच्या हिंदुसाम्राज्यांचीं सूत्रें गेलीं तेव्हां त्याच्या पराक्रमी संस्थापक सम्राट चन्द्रगुप्त ह्यानें उत्तरेच्या यूचींचा नि शकाचा उच्छेद मांडला. त्याचा पुत्र **सम्राट समुद्रगुप्त**, ज्यास विदेशी इतिहासकारहि भारतीय नेपोलियन म्हणतात त्यानें पंचनदांत घुसून शक–यूचींशीं दोनतीन पिढ्या चाललेल्या त्या महायुद्धांत विजयामागून विजय मिळवीत त्या परकीयांची धुळधाण उडविली. त्याचा पुत्र सम्राट चन्द्रगुप्त (द्वितीय) म्हणजेच विक्रमादित्य! कनिष्कापासून बळावलेली शक–यूचींची सत्ता त्यानें साफ लयास नेली. त्याचा शेवटचा शत्रू जो रुद्रसिंह त्याचा हिंदु सैन्यानें पुरता पराभव करून त्याची राजधानी जी उज्जयिनी तीहि घेतली. सिंधु नदीपासून पूर्व–पश्चिम–दक्षिण सिंधूपर्यंत जिकडे तिकडे हिंदुराष्ट्राचें विजयदुंदुभी पुन्हा अप्रतिहतपणें दुमदुमूं लागले.

जवळ जवळ दोनशें वर्षें काश्मीर ते नर्मदेपर्यंतचा सिंधु–गंगेच्यामधील भारतीय प्रदेश शक–यूचींच्या परकीय सत्तेखालीं होता. हिंदुवंशांनीं रणामध्यें त्यांचा चक्काचूर उडविला, हें तर झालेंच, पण त्या सामरिक विजयापेक्षांहि एक अत्यंत गौरवास्पद असणारा दुसरा जो विजय हिंदूंनीं लाखों शक–यूचींवर मिळविला, तो होता सांस्कृतिक विजय! वास्तविकपणें शक-यूची आंत आले तेव्हांच काय ते खरे परकीय होते, खरें शक–यूची होते, पण जेव्हां इ. स. १३० च्या संधीस कनिष्कानें बौद्ध धर्म आणि इतरांनीं वैदिक धर्म स्वीकारला तेव्हांच हिंदूंनीं त्याचा खऱ्या अर्थी पाडाव करून टाकला! एक शतकाचे आत हिंदु संस्कृतीचा ध्वज त्या शक–यूचींच्या राजधान्यांवर नि राज्यांवर फडकूं लागला! त्यांच्यातील सहस्रावधि जनतेनें नि शतावधि राजपुरुषांनीं, मोठमोठ्या राजवंशांनीं, वैदिक धर्म, भाषा, देश नि वेष स्वीकारला—कित्येकांनीं बौद्ध! हिंदुराष्ट्रानें त्यांचीं राज्येंच काय तीं छिनावून घेतलीं नाहींत तर स्वत्वसुद्धां सर्वस्वी छिनावून. महासर्प जसा त्याच्या प्रचंड जबड्यांत घुसणाऱ्या हरिणीला जिवंतच जिवंत पचवितो तसें हिंदुसंस्कृतीनें तिच्या जबड्यांत घुसणाऱ्या त्या लाखों शक–यूचींना आपल्या प्रखर जठराग्नींत गिळून गाळून नुसतें पचवून टाकलें. त्यांनाच हिंदु करून सोडले!

ह्या प्रबळ पराक्रमी गुप्त सम्राटांनी हिंदु राष्ट्राच्या ह्या अतुल विजयाची नि प्रभावाची घोषणा करण्यासाठी आपला वैदिक धर्माभिमानी गरुडध्वज पुढें घालून दळभारासहित यज्ञीय अश्व असिंधु सिंधु भारतवर्षाच्या चतुःसीमांपर्यंत नेला आणि तो अप्रतिरुद्ध संचार करून परततांच मोठ्या विजयोत्सवांत अश्वमेध यज्ञ साजरा केला!

आपल्या ह्या इ. स. ३०० ते ४०० च्या पराक्रमी कालखंडास विदेशीय इग्रज इतिहासकारहि सुवर्णयुग म्हणून संबोधतात. सुदैवानें त्याचवेळीं चीनी प्रवासी फाहाइन हा भारतवर्षांत आला होता. मेग्यास्थेनिसप्रमाणेंच त्यानेंहि ह्या हिंदुराष्ट्राच्या पराक्रमाचें, सुस्थितीचें नि वैभवाचें जे वर्णन लिहून ठेवलें आहे तेंच कुत्सित निंदेस सांगेल कीं, त्या काळी देखील हिंदूंचें जीवन पराजयाचें वा शरणागतीचें नसून शत्रूंना दांतीं तृण धरणाऱ्या पराक्रमाचें, राष्ट्रस्वातंत्र्याचें नि त्यांच्या जगांतील प्रबलतम साम्राज्याच होतें.

या काळांत हिंदूंच्या सांस्कृतिक दिग्विजयाचाहि कळस झाला होता. सहस्रावधि पंडित आणि भिक्षु सायबेरिया, मंगोलिया, चीन ते जपानपर्यंत धर्मप्रचार आणि सांस्कृतिक प्रचार करीत शतकोंशतकें जे खपत आले त्यांच्या परिश्रमांमुळें हिंदी महासागरापासून ते प्रशांत महासागरापर्यंत हिंदु संस्कृतीचा विजयध्वज त्या काळांत फडकूं लागला होता. केवळ बुद्ध वाङ्मयच नव्हे तर मनुस्मृति, महाभारत, रामायण, हिंदु वैद्यक, हिंदु ज्योतिष, हिंदु साहित्य, हिंदु तत्त्वज्ञान, काव्य, कथा, कला यांच्या ग्रंथभांडाराची भाषांतरें तिबेट, चीन-जपानचे सम्राट आपापल्या भाषांतून करण्यासाठीं मोठ्या सन्मानानें आमच्या शतावधि पंडितांना त्यांच्या देशांत आमंत्रून नेत होते. संस्कृत भाषा आणि लिपी देवभाषा आणि देवलिपीसारखी पूज्य समजली जात होती. पुन्हां पौराणिक कालांतली वादग्रस्त वस्तुस्थिति सोडून देऊनहि कोणासहि नाकारतां न येणारी आणि परकीयांनाहि सर्वसंमत झालेली ऐतिहासिक वस्तुस्थिति तेवढीच वर उल्लेखिली आहे.. कोणत्याहि राजकीय विजयाप्रमाणेंच धार्मिक नि सांस्कृतिक दिग्विजय हेहि गौरवास्पद नसतात काय? पुरातन ग्रीक आणि रोमन राष्ट्रें राजकीय दृष्टीनें आज नामशेष झालेलीं असलीं तरी त्यांची सांस्कृतिक प्राबल्याची नि गौरवाची छाप युरोपखंडावर आजहि पडलेली नाहीं का? हिंदू राष्ट्राच्या सांस्कृतिक दिग्विजयाचें जातां जाता वरील छेदकांत नुसतें दिग्दर्शन काय तें करून आम्ही हिंदू राष्ट्राच्या राजकीय नि सैनिक प्रतिकारक्षमतेचें नि विजयशालित्वाचें सूत्रच तेवढें विवेचिलें, वर उल्लेखिलेल्या 'सुवर्ण युगा' नंतरचा इ. स. ४०० ते १००० पर्यंतचा हिंदु इतिहासहि हेंच दाखवितो कीं हिंदु हे एखादें (Dead Sea) मृतसर नव्हते तर अमृतसर होतें.



ह्या सहा शतकांचा काळ एकंदरींत 'रजपूत युग' म्हणून प्रख्यात आहे. लंकेपासून गंधार काश्मीरपर्यंत नि सिंधूपासून ब्रह्मदेशाच्या अंतापर्यंतच्या ह्या भरतखंडावर बहुशः रजपूत राजांचा पराक्रमी राज्यें पसरलेलीं होतीं. मधूनमधून ब्राह्मण राजवंश आणि क्षत्रियेतर राजवंशाचीहि राज्यें चाललीं. उदाहरणार्थ, आज ज्याला अफगाणिस्तान म्हणतात तो गांधार राज्यांत समाविष्ट असून तेथें ब्राह्मण वंशाचें राज्य होतें. तसेंच सिंधही ब्राह्मण वंशीय राजांचे छत्राखालीं असे. परंतु सर्व हिंदुराष्ट्र राष्ट्र असें स्वतंत्र होतें. हिंदुध्वजच सर्वत्र अप्रतिहतपणें फडकत होते. कोणत्याहि परकीय - अहिंदु सत्तेची ह्या चार पांचशें वर्षांच्या दीर्घ कालखंडांत हिंदू राष्ट्रावर आक्रमण करण्याची छाती झाली नाहीं. ह्याला एकच अपवाद घडला. तो म्हणजे महंमद बिन कासिम ह्यानें केलेल्या सिंधु देशावरील स्वारीचा होय. तेथील ब्राह्मण वंशाचा शूर राजा दाहिर यानें मुसलमानाशी निकराची झुंज दिली. शेवटच्या लढाईत तो मारीत मारीत मारला गेला पण शरण गेला नाहीं. मुसलमानांनीं त्या स्वारींत सिंध जिंकला. पण तेव्हांपासूनच तो मुसलमानांच्या हातीं नित्याचा पडला ही समज चुकीची आहे. महंमद बिन कासमची पाठ फिरताच रजपूत राजांनीं उचल घेऊन मुसलमानांना सिंधमधून हुसकून दिलें. तेव्हांपासून सन १००० पर्यंत मुसलमानांची सतत आणि प्रबळ आक्रमणें अशीं झालींच नाहींत. सन १००० पर्यंत गांधार आणि काश्मिरमध्येंहि हिंदु राज्येंच नांदत होतीं. इतकेंच नव्हे तर काश्मीरच्या ललितादित्यासारख्या पराक्रमी, हिंदु राजांनीं मोंगल लोकांवर स्वाऱ्या करून मधून मधून सायबेरियापर्यंत आपलें अधिराज्य विस्तारलेलें असें. हे सर्व ऐतिहासिक उल्लेख आहेत, पौराणिक नव्हेत!

या कालपर्यंत हिंदु-राष्ट्रानें आपलें स्वतःचें राजकीय स्वातंत्र्य नि राजकीय वर्चस्व आसिंधु सिंधु भारतखंडांत भरभराटत ठेवलेलें होतें. इतकेंच नव्हे तर मोठमोठीं नौसैन्यें, नौयानें [आरमारें,] उभारून हिंदु महासागरापलीकडे असलेल्या देशांवरहि आपल्या सांस्कृतिक साम्राज्याप्रमाणेंच जें राजकीय साम्राज्य प्रस्थापिलें होतें तेंहि या इ. स. १८०० पर्यंतच्या कालखंडापर्यंत अबाधित ठेवलेलें होतें. मिसर, [इजित] पासून मेक्सिकोपर्यंत बुद्धकालच्याहि अनेक शतकांचें आधीं हिंदूनीं स्थापिलेल्या राजकीय साम्राज्याच्या आमच्या पौराणिक किंवा पाश्चिमात्यांनीं लिहिलेल्या अनैतिहासिक ग्रंथांतील अस्पष्ट उल्लेखांना आपण या लेखापुरते सोडून देऊं. अगदीं, ताम्रपट, शिलालेख, उत्खनन इत्यादींच्या सहाय्यानें परकीय फ्रेंच आणि डच संशोधकांनीं निर्विवाद म्हणून लिहिलेल्या इतिहासाप्रमाणेंच सिद्ध आहे कीं, इसवी सनाचे आरंभीपासून तो सन १००० पर्यंत आज ज्याला सयाम, जावा, सुमात्रा, बाली, आनाम, हिंदुचीन (इंडोचायना) म्हणतात, त्या सर्व देशांत भारतियांची राज्यें थाटलेलीं होतीं. तिकडे चीन सम्राटांच्या सैन्यावर अनेक लढ्यांत भारतीय सैन्यानें विजय मिळविले. तेथील नगरांचीं, देशांचीं, पर्वतांचीं, नद्यांची भारतियांनी ठेवलेलीं संस्कृत नांवें रूढ झालेलीं होतीं. ती आजही बहुतांशीं तशींच टिकून राहिलेलीं आहेत. मलय साम्राज्य हें तीन चार शतकें अत्यंत प्रबळ म्हणून गाजलें होतें. "अहो, पण नीं भारतीय बुद्ध पंथीयांचीं राज्यें होतीं!" असा निरर्थक लेख सुद्धां काढण्यास कोण्या हिंदुद्वेष्ट्या वावदुकाला इथें अवकाश नाहीं! कारण तीं सारीं राज्यें क्षत्रियादिक वैदिक धर्माभिमानी राजांनींच स्थापलेलीं होतीं. बुद्ध भिक्षूंप्रमाणेंच शैव वैष्णवादि पंडितहि भारतीय धर्म नि संस्कृति यांचा प्रचार करीत होते. या आठ नऊ शतकें चाललेल्या हिंदूंच्या भिन्नभिन्न राजवंशांतील नांवेंच पाहा,! चंपा (अनाम ते हिंदूचीन) त्या राज्यावर इ. स. ३८० मध्यें राजा भववर्मा हा बलाढ्य राजा राज्य करीत होता.त्यांच्या राज्यांतील विभागाचीं नांवें अमरावती; विजय नि पांडुरंगपूर अशीं होतीं. देवपारंगत म्हणून त्याची ख्याति होती. चीनच्या राजानें चंपावर केलेल्या एका प्रबळ लढाईत चंपा राज्य धुळीस मिळण्याचा प्रसंग आला असतां नवें भूदल नि सिन्धू दल उभारून चिनी सैन्याचा नि सत्तेचा ज्यानें इ. स. ५२६ मध्यें धुव्वा उडविला त्या हिन्दु राजाचें नांव रुद्रवर्मा होतें. अशींच इंद्रवर्मा, पुरुषोत्तम, श्री हरिवर्मा प्रभृति राजांचीं नांवेंच सांगतात कीं ते वैदिक धर्माभिमानी क्षत्रिय राजे होते. कंबुज (Cambodia) चें हिंदु राज्यहि असेंच होतें. सयामच्या राजवंशांत राजाराम पहिला राम दुसरा असे सहासात राजे राम या नांवाचेच होऊन गेले. अलीकडेच राज्यत्याग केलेल्या राजाचेंहि नांव 'राम' च हें वृत्तपत्रांच्या चालचलाऊ वाचकानाहि ठाऊक आहे. बुद्धाप्रमाणेंच शंकरांची नि विष्णूचीं प्रचंड मंदिरें या साऱ्या देशांतून उभारलेलीं होतीं. रामायण, महाभारत यांचीं पारायणें नि राममंदिरांतून त्यांच्या कथाचीं लोकनाट्यें होत होतीं. बुद्ध भिक्षु नि वेदविद ब्राह्मण यांचा सन्मान सारखाच होई. राज्याभिषेक ब्राह्मणांच्या करवी वैदिक संस्कारानींच होत. हिंदूंच्या त्या बृहत्तर भारतीय राजकीय दिग्विजयात त्यांनीं स्थापिलेलीं राज्यें न्यूनाधिक नऊशें वर्षें तरी भरभराटलेलीं होतीं हीं बहुतेक राज्यें मलाय, पांड्यें, चेर, चोळ कलिंगादि आंध्र या हिंदु राजवंशांनीं आणि केव्हां केव्हां सर्वसाधारण हिंदु जनतेंतच निर्माण झालेल्या पराक्रमी पुरुषांनीं स्थापिलेलीं होतीं. इकडील समुद्रातून भारतीयांची शेवटची उल्लेखनीय स्वारी म्हणजे पांड्य राजानें एक बलाढ्य सिंधुदल घेऊन ब्रह्मदेशावर केलेली स्वारी होय. ब्रह्मदेश जिंकून परत येतां यतां अंदमान द्वीपपुंजहि त्यानें हस्तगत केला नि नंतर त्या स्वारीच्या गौरवार्थ भारतांत आल्यावर एक जयस्तंभ उभारला हीं घटना अकराव्या शतकांतीलच आहे.

म्हणजे मागच्या कालखंडाप्रमाणेंच या इ. स. ४०० ते १००० च्या हिंदु इतिहासांचा कालखंडहि राजकीय दृष्ट्यासुध्दां पराजयाचा नसून उलट प्रबळ विजयाचा नि वर्चस्वाचा आहे. आमच्या बलुचिस्थान अफगणिस्थान हिंदुकुशापासून ब्रह्मदेशाच्या पलिकडच्या सीमेपर्यंत नि सिंधुसागर गंगासागर हिंदुमहासागर ते प्रशांत महासागराच्या हिंदु चीनच्या सीमेपर्यंत हिंदु राज्याचीं अखंड मालिका पसरलेली होती. सिंधमध्यें झालेली अरबाची स्वारी नि हिंदूचा तात्पुरता पराजय हाच काय तो अपवाद. पण डंकर्कला इंग्रजांची त्या कोपऱ्यांतील हार झाली म्हणून ह्या गेल्या महायुद्धांत इंग्रज पराभूत झाले नव्हे. त्याहिपुढें जाऊन इंग्रजांचा इतिहास म्हणजे अखंड पराजयाचा इतिहास आहे. कारण डंकर्कला त्यांची हार झाली! असें विधान करणें म्हणजे निर्भेळ बाष्कळपणाचा नव्हे काय?

हिंदुराष्ट्रावर पूर्वी कोणत्याहि आक्रमणापेक्षां मुस्लिमांचें आक्रमण हेंच अत्यंत भयंकर आणि दीर्घकालीन असें झालें. निष्कारण बाष्कळ आत्मनिंदा ही जशी राष्ट्रघातकच तशीच निष्कारण नि बाष्कळ आत्मप्रौढीहि राष्ट्रघातक असते. झालेला पराजय मान्य करण्यास ते कचरतात कीं, ज्यांना ज्यांना त्या पराजयांचा सूड घेण्याची अंगांत धमक नसते! अत्यंत घनघोर संकटांतूनहि झुंजून त्यांना जिंकून, पुरून उरणारी धमक हिंदुराष्ट्राच्या रोमारोमांत भिनलेली असे आणि तिच्या बळावर त्या हिंदुराष्ट्रानें पराजयाचा, पुरापुरा सूड पुनः पुन्हां उगविला हे त्या राष्ट्राच्या युगव्यापी इतिहासाच्या या लेखांतील आतांपर्यंत केलेल्या समीक्षणावरून निर्विवादपणें सिध्द झालेलेंच आहे. म्हणूनच मुस्लिमांच्या भयंकर आक्रमणामुळें पहिल्या तीन चार शतकांत हिंदूंचें पराभवामागून पराभव होत गेले. हें सत्य जसें घडलें तसेंच, पण ज्या प्रमाणांत तें घडले त्याच प्रमाणांत काय तें स्पष्ट न सांगण्याचा भेकड यत्न आम्हीं मुळींच करीत नाहीं. ऐतिहासिक वर्णन हा ह्या लेखाचा विषयच नव्हे. तर त्या इतिहासाचें धांवतें समीक्षण हाच एवढा या लेखाचा जो विषय आहे त्यास अनुसरून आम्हीं एका वाक्यातच स्पष्टपणें सांगून टाकतों कीं, साधारण इ. स. १००० च्या वर्षापासून मुस्लीमाशीं हिंदूंचे जे महायुध्द घडलें गेलें त्यांत साधारणतः सन १५०० पर्यंत हिंदू सैन्याची मुसलमानी सैन्याशीं जिथें जिथें मोठमोठ्या लढाया झाल्या तेथें तेथें शेकडा नव्वद लढायांत हिन्दु पक्षाचा धुव्वा उडत गेला.

हिन्दू मुस्लीम महायुध्दाच्या पूर्वार्धांतील हिन्दू राष्ट्राच्या या सतत पराभवाने कोणाला आनंदाचो उकळी फुटत असेल तर त्यांच्या त्या आनंदांत तेवढ्या प्रकरणीं विरजण घालण्याचा मोह आम्हांस मुळींच होणार नाहीं. पण ज्याप्रमाणें मुसलमानांनीं पूर्वार्धात अफगणिस्थानापासून तो कन्याकुमारीपर्यंत हिंदूंच्या शेकडा नव्वद लढायामागून लढायांत धुव्वा उडवित आणि हिंदूंचीं राज्यामागून राज्यें घेत सर्व भरतखंडभर 'हिरवा चांद' फडकवला, त्याचप्रमाणें त्यांना प्रत्येक पावलीं टकरा देत देत प्रतिकार करीत करीत त्या शतकव्यापी शस्त्रसंघर्षात शेवटीं जेव्हां हवी ती ठिणगी पडून सह्याद्री पेटला, तेव्हा हिंदु विक्रमापुढें मुसल्मानांसहि पळतां भुंई थोडी झाली, तोडीस तोड उडाली.

साधारणतः, सन १६०० पासून तो १७९३ पर्यंत जेथें जेथें हिंदु सैन्याची मुसमानी सैन्याशीं लढाई जुंपली तेथें तेथें शेंकडा नव्वद लढायांत हिंदूंनीं मुसलमानांचा धुव्वा उडविला. मुसलमानांच्या बादशाह्या मागून बादशाह्या नि नवाब्यामागून नवाब्या बुडवीत हिंदूंच्या सेना मराठ्यांच्या सेनापत्याखालीं प्रत्यगीं अटकेवरील 'हिरव्या चांदाला' धुळींत लोळवून तिथें भगवाध्वज उभारत्या झाल्या.

भाऊसाहेब पेशव्यांनीं अकबर अवरंगजेबाचें बादशाही तक्त हिंदू घणाचा घाव घालून अक्षरशः फोडून टाकलें. भाट चारणांच्या जयघोषानीं आकाश दुमदुमूं लागलें;—

|| आज सात शतकानें पायीं मिरवित सोनेरी तोडा ||
|| हिंदु जयाचा पिई पुनरपि सिंधुनदीचें जल घोडा || १ ||
|| हिंदू वीराचा कीं श्रीशें असे यशस्वि हट केला ||
|| आज हिंदवी जरीपटका कीं पुन्हां पोंचला अटकेला || ३ ||

त्यातही हें ध्यानात ठेवले पाहिजे कीं मुसलमानांशीं हें सप्तशतकव्यापी महायुद्ध लढवित असतांनाच 'फिरंगाण' (यूरोप) मधील इंग्लीश, डच, पोर्तुगीज, फ्रेंच प्रभृति राष्ट्रांशींहि हिंदूंना टक्कर द्यावी लागत होती, ह्या सर्व परकीयांशीं हिंदूंचें पुढारीपण घेवून विशेषतः महाराष्ट्र हा, भूमीवर नि समुद्रावर समकालीन नि सतत युद्ध झुंजवीत राहिला. भाट गातातः—

|| पठाण, मोंगल, तुर्क, इराणी, हबशी, शिद्दी परोपरी ||
|| पोर्तुगीज फलंदाज फिरंगी इंग्रेजादिक गोरखली || १ ||
|| इराणापासुनि फिरंगाणपर्यंत शत्रूची उठे फळी |
|| सिंधुपासुनि सेतुबंधपर्यंत रणांगण भू झाली || २ ||
|| तीन खंडीच्या पुंडांची ती परंतु सेना बुडविली |
|| सिंधुपासुनी सेतुबंधपर्यंत समर भू लढवीली || ३ ||

ह्या कालखंडाचे शेवटीं मुसलमानांच्या राज्यसत्तेचा चक्काचूर उडवून हिंदुस्थानमध्यें पुनरपी हिंदूराज्य जिकडे तिकडे कसें प्रस्थापिले गेलें तें उल्लेखिलेल्या ओळींतच निर्विवादपणें दिसून येईल. जवळ जवळ काबुल नदीपासून काश्मीर–पंजाब–पतियाळापर्यंत शीख–राजपूत–जाटांची हिंदुराज्यें, नेपाळांत गुरख्यांचे हिंदुराज्य, दिल्लीपासून तंजावरपर्यंत आणि काठेवाडपासून ओरिसापर्यंत मराठ्यांचें हिंदुसाम्राज्य आणि खालीं म्हैसूर, त्रावणकोरचीं हिंदुराज्यें ! ! सात शतकें लढत लढत सतराव्या शतकांच्या आरंभीं आरंभी हिंदूंनीं हिंदुस्थानांतून मुसलमानी राज्यसत्तेचा असा पुरा पुरा नायनाट केला होता !

हिंदुराष्ट्राच्या इतिहासाचे गेल्या पाच सहस्त्रवर्षांचें धावतें समालोचन वर केलेलें आहे. हिंदुराष्ट्रावर अनेक आपत्ती अशा आल्या कीं त्यांच्या फटकाऱ्यासरशीं मोटमोठीं राष्ट्रें नामशेष होऊन गेलीं. परंतु क्वचित् चीनचा अपवाद सोडतां, जगाच्या इतिहासांत अशा अनेक आपत्तींशीं झुंजून, अनेक बलाढ्य शत्रूंना पादाक्रान्त करून शतकव्यापी महायुद्धें लढवून, जर कोणतें राष्ट्र आज पाच सहस्र वर्षें आपलें अस्तित्व आपल्या पराक्रमानें टिकवून राहिलें असेल, आपलें स्वातंत्र्य पुनःपुन्हां प्रस्थापित करीत आलेलें असेल, आपल्या धर्माचा, आपल्या संस्कृतीचा ! आपल्या अजिंक्यतेचे प्रभाव गाजवीत आलेलें असेल तर तें हिंदुराष्ट्रच काय तें होय ! भयंकर जीवनकलहांत तें झुंजत राहिले, म्हणून हें हिंदुराष्ट्र जगलें आहे. राष्ट्राराष्ट्रांच्या साऱ्या प्रतिपक्षांमध्यें तें आपल्या चिवटपणानें नि प्रबळतेनें या जीवनकलहांच्या स्पर्धेत निसर्ग नियमाप्रमाणें जगावयास योग्य ठरलें म्हणून हें हिंदुराष्ट्र आजहि जिवंत आहे. हिंदुराष्ट्राचा इतिहास अपजयशील नसून कोणत्याही राष्ट्राहूनहि तो अत्यंत उत्कटपणानें विजयशीलच आहे ! ●●●








# हि|मा|ल|या|चीं हां|क

*आज हिमालय संकटांत आहे. सर्व जगात उत्तुंग असलेल्या या हिम-राजावर उत्तरेकडून आक्रमण झालें आहे. विश्वासघातानें शत्रू आत घुसला आहे. अशा वेळीं महाराष्ट्राचा शूर सह्याद्री-यशवंतरावांच्या रूपानें-हिमालयाच्या संरक्षणास गेला आहे. इतिहास घडविण्याचे सामर्थ्य मराठी माणसांत आहे असें* **संरक्षण मंत्रि यशवंतराव चव्हाण** *म्हणतात ते योग्यच आहे—*



मित्रहो,

आज आपल्या राष्ट्राच्या आणीबाणीच्या अशा क्षणीं मी तुमच्याशीं बोलत आहे. इतिहासाची नोंद आहे तेव्हापासून आपला शेजारी म्हणून असलेल्या चीननें आपल्या भूमीवर आक्रमण करून आपला कांहीं मुलुखहि बळकाविला आहे. भारत व चीन यांच्यामधील सीमेचा वाद शांततेनें व सलोख्यानें मिटावा या दिशेनें आपण प्रयत्न करीत असतांनाच चीननें आपल्या सरहद्दीवर चढाई सुरू केली आहे. अशा प्रकारें कपटानें चढाई करून चीननें केवळ आंतरराष्ट्रीय कायद्यालाच नव्हे, तर मानवी मूल्यांनाहि काळीमा फांसला आहे.

**आम्ही जिंकूच जिंकू**

चीननें असें कां करावें हा काही आमच्या दृष्टीनें आज महत्त्वाचा प्रश्न नाहीं, आणि म्हणून त्याचा विचार करण्याचे आम्हांला कारण नाहीं. आमच्या भूमीवर त्या देशानें केलेलें आक्रमण उखडून काढून आमचें स्वातंत्र्य अबाधित राखणें हा आमच्यापुढील आज एकमेव प्रश्न आहे. चीननें आज आपल्यावर जी तलवार उपसली आहे तिला आतां आपल्याला तलवारीनेंच उत्तर द्यावयाचें आहे. आम्ही शांतता-वादाचा पुरस्कार केला असला तरी स्वाभिमान सोडलेला नाहीं आणि आमच्या भूमीवर झालेले आक्रमण आम्ही आमच्या बाहुबळावर उखडून काढल्याशिवाय रहाणार नाहीं. अपार कष्ट व त्याग करून मिळविलेलें स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं आम्ही सर्वस्व पणाला लावूं. आज ज्या भागांत आपले जवान लढत आहेत तो भाग अत्यंत डोंगराळ व अडचणीचा असा आहे आणि पहिली चढाई चीननें केली असल्यामुळें आपल्याला कांहीं ठाणीं सोडावीं लागलीं व कोठें कोठें माघार घ्यावी लागली. पण त्यामुळें आपण नाउमेद होण्याचें कारण नाहीं व आपला धीर तर मुळींच खचूं देतां कामा नये. सीमेवर काय होत आहे याबद्दल आपणा सर्वांना चिंता वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. परंतु या चिंतेला घबराटीचें स्वरूप मात्र आपण येऊं देतां कामा नये. आलेलें संकट आपल्या सर्व बळानिशीं परतवून लावावयाचे हा एकच विचार व हा एकच निर्धार आज आपण ठेवला पाहिजे. आम्हीं जिंकूच जिंकू अशी विजयाची मनोवृत्ति आज लोकांमध्यें निर्माण झाली पाहिजे.

**कसोटीचा क्षण**

गेल्या कांहीं दिवसांत सबंध भारतात या दृष्टीनें जी जागृति झाली आणि आलेल्या आपत्तीचा बीमोड करण्याचा जो दृढनिश्चय लोकामध्यें दिसून येत आहे त्याचा मला अभिमान वाटतो. आमच्यामध्यें अंतर्गत बाबतींत कांहीं मतभेद असलें तरी आमच्या या भूमीविरुद्ध जर कोणी खड्ग उपसलें तर आम्ही सर्वजण एक आहोंत ही गोष्ट आम्ही सिद्ध करून दाखविली आहे. राष्ट्रीय ऐक्याची ही भावना आणखी वाढीस लागली पाहिजे, तिला धार चढली पाहिजे. आजच्या प्रसंगीं, धर्म, जात, राजकारण वगैरे सर्व मतभेद बाजूस सारून चीनच्या चढाईनें निर्माण झालेल्या राष्ट्रीय आपत्तीचें निर्मूलन करण्याकरितां आपण सर्वांना बध्दपरिकर असलें पाहिजे. कारण आपल्या कसोटीचा हा क्षण आहे आणि या कसोटीस उतरणें ही आपल्यावरील ऐतिहासिक जबाबदारी आहे.

तुमच्याशीं बोलतांना मला आज एका गोष्टीची तीव्रतेनें आठवण होते. महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या त्या चिरस्मरणीय प्रसंगीं मी आपल्या प्रधानमंत्र्यांना असें जाहीर आश्वासन दिलें होतें कीं, 'महाराष्ट्राचें हें जें राज्य निर्माण झालें आहे तें मराठी जनतेच्या कल्याणाचें काम तर करीलच, पण मराठी भाषिकांच्या जवळ जें देण्यासारखें आहे, त्यांच्या जीवनामध्यें जें चांगलें आहे, जें उदात्त आहे, त्याचा जर श्रद्धापूर्वक

उपयोग करावयाचा असेल तर तो आम्हीं भारतासाठीं प्रथम करूं. कारण आमचा पहिल्यापासून विश्वास आहे कीं, भारत राहिला तर महाराष्ट्र राहील, भारत मोठा झाला तर महाराष्ट्र मोठा होईल आणि जर कधीं भारताच्या हिमालयावर संकट आलें तर महाराष्ट्राचा सह्याद्रि आपल्या काळ्या फत्तराची छाती हिमालयाच्या रक्षणाकरितां उभी करील.'

## विनंति आणि प्रतिसाद

आपल्या प्रधानमंत्र्याना मी असें आश्वासन दिलें, कारण महाराष्ट्राचें मन मी जाणतो. तुम्हां सर्वांचा प्रतिनिधी या नात्यानेंच मी तें दिलें होतें. मायभूमीसाठीं पडेल तो त्याग व कष्ट सोसण्याची व शौर्याची शर्थ करण्याची महाराष्ट्राची परंपराच आहे. आणि सध्याच्या प्रसंगांत महाराष्ट्र या परंपरेला जागेल याबद्दल मला तिळमात्र शंका नाहीं. प्रधानमंत्र्याना दिलेलें आश्वासन पुरें करण्याची वेळ आज आली आहे. या हेतूनें नववर्षदिनीं लोकांनीं सर्वत्र सभा भरवून राष्ट्रीय ऐक्याची प्रतिज्ञा घ्यावी व आपल्या पवित्र मायभूमीचें संरक्षण करण्याचा आपला दृढ निर्धार व्यक्त करावा, अशी विनंति मी राज्यांतील जनतेस केली होती आणि मला आनंद वाटतो कीं आपण माझ्या हांकेला उत्साहानें प्रतिसाद दिलात. या प्रतिज्ञेनुसार आपण कार्य करीत राहाल याविषयीं मला पूर्ण विश्वास आहे.

या आणीबाणीच्या प्रसंगांतून यशस्वीपणें पार पाडण्याकरितां आपण कांहीं गोष्टी, कांहीं पथ्यें कटाक्षानें पाळलीं पाहिजेत. याबाबतींत आपल्या प्रधानमंत्र्यांनी सबंध राष्ट्राला जो आदेश दिला तो आपण प्रत्येकानें नीट ध्यानांत ठेवला पाहिजे व त्याप्रमाणें आचरण केलें पाहिजे.

## प्रत्येकाला आघाडी सांभाळायची आहे !

पहिली गोष्ट म्हणजे कोणत्याहि प्रकारच्या अफवांवर विश्वास न ठेवतां मायभूमीसाठीं प्राणपणानें लढणाऱ्या आपल्या जवानांच्या शक्तीवर व सामर्थ्यावर विश्वास ठेवून आपण त्यांच्या पाठीशीं उभे राहिलें पाहिजे. आजच्या लढाईची तऱ्हा अशी आहे कीं ती केवळ रणांगणावर लढली जात नाहीं. सैन्य रणांगणावर लढत असता नागरिकांनाहि ही लढाई जिंकण्यासाठीं प्रयत्नांची शिकस्त करावी लागते. सैन्याचें सामर्थ्य वाढविण्याकरितां सर्व क्षेत्रांतील उत्पादन वाढलें पाहिजे. शेती, कारखानदारी वगैरे सर्व क्षेत्रांतील उत्पादन वाढविणें ही या दृष्टीनें आजची अत्यंत निकडीची गरज आहे. त्यासाठीं जादा काम करावें लागलें तर तें आनंदानें करण्याची तयारी आपण ठेवली पाहिजे. याचबरोबर संप, टाळेबंदी वगैरे ज्यामुळें उत्पादनांत खंड पडेल अशी कोणतीहि गोष्ट करावयाची नाहीं अशी आपण प्रत्येकानें पक्की खूणगांठ बांधली पाहिजे. आणखी एक महत्त्वाचें पथ्य आपण पाळलें पाहिजे. या आणीबाणीच्या प्रसंगाचा गैरफायदा घेऊन जर कोणी व्यापारी जीवनावश्यक वस्तूंचे भाव वाढवूं म्हणेल तर तो राष्ट्रद्रोह ठरेल. अशा बाबतींत लोकांनीं जागरूक राहून आणि जरूर तर नागरिक समित्या स्थापन करून त्याला आळा घातला पाहिजे. मला विश्वास आहे कीं, आपला व्यापारीवर्ग राष्ट्रप्रेमाच्या बाबतींत इतरांच्या मागें रहाणार नाहीं; आणि भाववाढ, काळाबाजार अशा हीन कृत्यांपासून अलिप्त राहील. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपण आज जो संरक्षण निधि उभा केला आहे त्याला प्रत्येकानें आपापल्या कुवतीनुसार हातभार लावावा. पैसे, सोने वा सोन्याचे दागिने या रूपानें तुम्हाला संरक्षण निधींत भर घालतां येईल. कपटी शत्रूकडून आज आमच्या मायभूमीच्या अंगाचे लचके तोडण्याचा प्रयत्न होत असतांना आमच्या श्रीमंतवर्गांतलि स्त्रिया आपल्या अंगावर सोन्याचे अलंकार घालण्यांत भूषण मानणार नाहींत असा मला विश्वास वाटतो. हा संरक्षण निधि आपण जेवढा वाढवूं तेवढे आपल्या सैन्याचे हात बळकट होणार आहेत हें लक्षांत ठेवा. या फंडाबाबत मला एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे कीं, अनधिकृत रीत्या कोणी हा फंड जमवूं नये व जनतेनेंहि योग्य पावती वगैरे घेतल्याशिवाय अधिकृत ठिकाणांखेरीज इतर ठिकाणीं पैसे देऊं नयेत.

हें कार्य प्रत्येक नागरिकाचें आहे. मग तुम्ही कुठल्याहि क्षेत्रांत कुठलेंही काम करीत असा प्रत्येकालाच आघाडी सांभाळावयाची आहे. प्रत्यक्ष सरहद्दीवर लढणाऱ्या आपल्या जवानांना ज्या निर्धारानें लढावयाचे आहे त्याच निर्धाराने तुम्हां आम्हांला येथें काम करावयाचें आहे. तेथें लढणाऱ्या जवानांना आपण एकटे नाहीं, चाळीस कोटी लोक आपल्या खांद्याला खांदा लावून उभे आहेत असें वाटलें तरच त्यांना उत्साह येईल चेव येईल. शिवाय जें राष्ट्र आर्थिकदृष्ट्या आणि उत्पादनदृष्ट्या भक्कम असतें तेंच राष्ट्र कुठल्याहि संकटाला तोंड देऊं शकतें. या संकटास आपल्याला किती काळ तोंड द्यावे लागेल हें सांगता येत नाहीं. कदाचित कांहीं महिने व कांहीं वर्षेंहि आपल्याला लढावे लागेल हें ध्यानांत ठेऊन आपण कष्ट करण्यास, त्याग करण्यास तयार झालें पाहिजे. युद्धासाठीं शस्त्रास्त्रें लागतात आणि त्यांचें उत्पादन वाढलें पाहिजे हें तर खरेंच, पण केवळ तेवढ्याने भागत नाहीं. अन्न, कपडे वगैरे वस्तूंचीहि शस्त्रास्त्रांइतकीच जरुरी असते. आपल्या बाबतींत एक सुदैवाची गोष्ट अशी कीं उत्पादन वाढविण्याचें कार्य आपण आपल्या पंचवार्षिक योजनाद्वारां आधींच हातीं घेतले आहे. अर्थात ही योजना दीर्घकालीन स्वरूपाची आहे. तेव्हां अशा प्रकारें मधेंच संकट उद्भवलें म्हणून ती सोडून देण्याचे कारण नाहीं. फक्त निकडीची गरज लक्षांत घेऊन तींत फेरफार करावे लागतील.

पान ४२ वर

## या भारापासूनि सोडवी मेदिनी

महाराष्ट्र विधान सभेंत यशवंतरावांचा गौरव सभापति भारदे यांनी पुढीलप्रमाणे पद्यरचनेने केला :—

**प्रज्ञावंता यशवंता**
**साथ शांतीला शस्त्रांची**
**चक्रधराला धनुर्धराची**
**हिमालयाला सह्याची**

आणि पुढे, भगवान कृष्णाने अर्जुनाला जे सांगितल होते त्याची आठवण सभापतींनी श्री ज्ञानेश्वरांच्या पुढील शब्दांनीं करून दिली.

**जगी किर्ती रूढवी**
**स्वधर्माचा मानू वाढवी**
**या भारापासून सोडवी**
**मेदिनी हे।**




# डॅडी ममीची जोडी

20 एप्रिलची दुपार. मुकी आणि तापलेली कॅन्व्हेंट स्कूलच्या आवारांतील इमारती आणि झाडं शांतपणें शिस्तीनें उभी होतीं. किंचितसुध्दां न हलतां पानं हेलावत नव्हती. फुल खिदळत नव्हतीं. माणसाची आकृति कुठेंच दिसत नव्हती.

इतक्यांत फरकन एक मोठी मोटार आंतल्या आवारांत शिरली शिरली एखाद्या बोटीसारखी. सुळकन् मोटारीचें निळसर दार उघडलें आणि पडदा उघडल्यावर रंगभूमावर एकादी सुदरी अवतरावी त्याप्रमाणें मोटारीतून एक रुपयौवना बाहेर आली. खांद्यावरचा घरंगळणारा रेशमी पदर सावरींत. डाव्या हाताच्या निमुळत्या बोटांनीं तिनें आपल्या कुरळ्या केसांचा बॉब चाचपला. रंगीत निमुळत्या बोटांनीं केसाच्या लाटांवर नाजुक नृत्य केल...मग इकडे तिकडे तिची मोहक नजर भिरभिरली... ओठांच्या रंगीत पाकळ्या विलग झाल्या...आणि आंत दडलेला मोत्याचा सर हेलावला.

समोरूनच पायघोळ पांढऱ्या झग्यामध्यें सर्वांग झांकून घेतलेली नन लगबगीनें आवाज न करतां मोटारजवळ आली. तिच्या हाताला धरून एक अगदीं व्यवस्थित पोशाख केलेला स्मार्ट मुलगा आला. त्याच्या कपड्यांची इस्त्री उठून दिसत होती. बुटांचें पॉलिश चमकत होतें. त्याची पाउले शिस्तीत पडत होती. नोकरानें सामान मोटारच्या मागें टाकलें व ननने तो मुलगा त्याच्या आईवडिलांच्या स्वाधीन केला. गळ्यांतला क्रॉस धरून प्रार्थना केली. माता-पित्यांची बहुमोल ठेव त्यांच्या स्वाधीन केली. प्रभू येशूचं स्मरण करून आई-वडिलांनीं आपली ठेव स्विकारली. थँक्सची देवाण–घेवाण झाली. हस्तांदोलन झालें. आई



अनुक्रमणिका

वडिल पुढे बसले. तो स्मार्ट मुलगा ऐटींत पोझ घेऊन मागे बसला. गाडी सुरू झाली.

अशाच नवीन नवीन गाड्या येत होत्या. अत्याधुनिक आई वडील येत होते. आणि आपल्या मुलांना घेऊन जात होते. पाश्चात्य वैभवी जीवन, कडक इस्त्री, पॉलिश सारखं नॉयलानी, लिपस्टिकी जीवन सारं कसं साफ, चकचकीत, डोळे दिपविणारं, कुठे सुरकुती नाहीं, धूळ नाही कीं—

वसतिगृहाच्या हॉलमध्ये राजीव एकटाच कॅरमच्या सोंगट्यांचा उंच ढीग करीत बसला होता.... पलिकडे दोन चार मुलं कांहींतरी खेळत होती. त्यांच्याकडे राजीवचं लक्ष नव्हत. त्याच्या समोर भले मोठे प्रश्नचिन्ह एखाद्या राक्षसा सारखं उभं होतं...त्याला तो मोठा गहन प्रश्न सुटतां सुटत नव्हता...

पान ४० वरून

संरक्षणाची बाब महत्त्वाची असल्यामुळें कांहीं योजनांचा निधि या कामासाठीं वापरावा लागेल.

## १० कोटी रुपयांचा विडा

मुंबईतील नागरिकांनीं एक पांच कलमी कार्यक्रम तयार केला आहे. आणि या च धर्तीवर महाराष्ट्रांत सर्वत्र नागरिक कार्य करतील असा मला विश्वास वाटतो. मुंबई शहराने राष्ट्रीय संरक्षण निधीचा पहिला हप्ता म्हणून १० कोटी रुपये जमविण्याचा विडा उचलला आहे. कामगारांनीं महिन्यांतून एक दिवस जादा काम करून या कामाचे वेतन व मालकांनीं ह्या दिवसाचा फायदा राष्ट्रीय निधीस देण्याचा विचार केला आहे. आघाडीवर लढत असतांना जायबंदी झालेल्या जवानांना रक्त देण्यासाठीं मुंबईच्या नागरिकांनीं रक्तदान करण्याची मोहीम सुरू केली आहे आणि संप, टाळेबंदी करावयाची नाहीं असेंहि ठरविण्यांत आले आहे. मुंबईप्रमाणेच इतर मोठ्या आणि महत्वाच्या शहरांत अशा तऱ्हेच्या संरक्षण समित्यांचे काम सुरू होत आहे. जेथें झाले नसेल तेथे जिल्हाधिकाऱ्यांना सहकार्य देऊन समित्या तयार करण्यांत येतील असा मला विश्वास आहे. त्यानंतर राज्य समिति बनविण्यासाठीं एक सभा बोलविण्याचा माझा इरादा आहे.

## आतां झोप नाहीं

आज आपण मोठ्या अडचणीच्या परिस्थितींतून जात आहोंत. भारताचा मानदंड म्हणून ज्याचा आपण सदोदित गौरव करतो तो हिमालय आज संकटांत पडला आहे. हजारों वर्षें ज्यानें पित्याप्रमाणें आमचें संरक्षण केलें त्या हिमालयाची कैदेतून मुक्तता कल्याखेरीज आता आम्हांला झोप नाहीं. आपला स्वाभिमान कसोटीला लागला आहे. आपली स्वातंत्र्यप्रियता ऐरणीवर घणाचे घाव झेलण्यास सिद्ध झाली आहे. शरणागति हा शब्द आमच्या तरी शब्दकोषांत नाहीं. स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं मरून जाऊं पण शरणागतीचा स्वीकार करणार नाहीं, हा आमचा निर्धार आहे. महाराष्ट्राला अशा प्रसंगाची मुळीच भीति वाटत नाहीं. आपण मराठी माणसें इतिहासाचा अभिमान बाळगतो. हा अभिमान सार्थ आहे एवढेंच नव्हे तर तसाच इतिहास पुन्हा घडविण्याचे सामर्थ्य आमच्यामध्यें आहे हें सिद्ध करण्याचें आवाहन भारतानें केलें आहे. महाराष्ट्र भारताबरोबर या कसोटीस पूर्णपणें उतरेल याविषयीं मला तरी मुळीच संदेह नाहीं. ●●●

राजूला सारखं वाटत होतं...आपले डॅडी आणि ममी एकदम आपल्याला भेटायला कां नाहीं येत ? आज आपल्याला बोर्डिंगमध्ये येऊन किती दिवस...नाहीं किती महिने झाले. पण डॅडी आणि ममी कधी एकत्र येत नाहींत. डॅडी आपल्याला भेटायला बॉम्बेहून येतात. ममी म्हणे पुण्याला नोकरी करते. आणि आपण इथं पांचगणीच्या कान्व्हेंट स्कूल मध्यें.

हें असं कां !...ह्याचे गणित राजूला सुटतां सुटत नव्हतें...गेल्या वर्षी तो बोर्डिंगमध्ये आला डॅडीच्या बरोबर. डॅडी म्हणाले इथे एक बेस्ट स्कूल आहे. तिथे तूं शिकायला रहा...जशी कांहीं बॉम्बेला बेस्ट स्कूल नाहींतच ! कांहींतरी खोटच सांगितल मला डॅडींनी......परवांच आपण फ्रेनी खंबाटाला विचारल तूं कांग बोर्डिंगमध्यें आलीस !... तर ती म्हणाली कशी. ' माझे डॅडी ममी फार भांडतात...मग डॅडी म्हणाले तूं जा बोर्डिंगमध्यें...'

तसं तर नसेल ? आपले डॅडी ममीशी भांडतात ? ही मोठी माणसं विचित्रच बुवा ! आम्हांला सांगतात... Love each other Do not quarrel. आणि स्वतः बघा...स्वतःच डॅडी ममीशी भांडतात. छे बुवा. हे कांहींतरीच...यांच्या भांडणामुळें आपल्याला बोर्डिंगमध्यें राहवं लागतं !...

बोर्डिंगमध्यें आल्यापासून एकदांहि डॅडी आणि ममी बरोबर आलें नाहींत. सर्वांचे डॅडी ममी येतात आणि मग त्यांना घेउन जातात हिंडायला फिरायला. आपली ममी येते एकटी...किंवा कधीं कधी त्या शोभा आंटीला घेऊन. परवां ममी बरोबर कोण ते आले होते....ममी म्हणाली—हे तुझे अंकल...आपल्याला नाहीं बुवा ते आवडलें. चॉकलेटचा डबा त्यानीं आपल्या हातांत दिला आणि किस घेतला आणि शी ! आपल्याला मुळींच आवडला नाहीं तो. पुसून टाकला त्यांचा किस ! आपले डॅडी किती छान किस करतात. त्याच्याशिवाय आपण नाहीं आतां कुणाला किस करून देणार !

तो नीतिन् किती लकी...कालच त्याच्या डॅडी आणि ममीच्या मध्यें दोघांचा हात धरून तो नाचत नाचत गेला. आपण असें कधीं करणार ? एक हात डॅडींचा धरायचा एक ममीचा आणि झोके घेत जायचं !

इतक्यांत रचलेल्या सोंगट्यांचा ढीग धाडकन् कोसळला...राजू आपल्या स्वप्नांतून जागा झाला....त्या सोंगट्या तशाच सारून तो धांवत मुलांच्या कळपांत गेला...मेरी सॉलोमन आपल्या डॅडी ममीच्या बरोबर चालली होती बाय बाय करीत. रमेश गुमाचे बाबुजी आणि माताजी सिस्टर डॉरीनशि बोलत होते. आडीत जोशीचे आई बाबा त्याच्या सामानाजवळ उभे होते.........

छे ! राजीवला सगळ्यांचे आईवडील जोडी जोडीनें दिसत होते आणि आपले डॅडी आपल्याला उद्यां न्यायला येणार त्यांच्याबरोबर ममी कां नाहीं येत...?

डॅडी आपल्यावर किती प्रेम करतात' ममी तर आपलें किती लाड करते. पण दोघं आपल्यावर एकदम प्रेम करतील तर ? डॅडी प्लस ममी दोघांचं प्रेम एकदम डबल् ! किती इझी सम—पण आपल्या डॅडीममीला हे इझी सम कळत नाहीं...अगदीं फूलीश बुवा !

विचारांनीं शिणलेला तो इवलासा मेंदू...त्याला हा गहन प्रश्न सोडवता येत नव्हता. गांठींच बसल्या जात होत्या. उकल उलगडण्याची शर्ती लागत नव्हती.. बावरलेला राजू फ्रेनीकडे गेला. त्याला बोर्डिंग-

मध्यें धीर देणारी ती त्याची ताई. 'फ्रेनी तुझे डॅडी ममी नाहीं आले अजून?' 'अरे राजू Don't be silly.–माझी ममी कशी येईल ती तर heaven मध्येंच आहे......डॅडी येतील आतां.' राजूला एकदम वाईट वाटलं...सतरावेळां त्यानं सॉरी सॉरी करीत फ्रेनीला कवटाळल! पुअर फ्रेनी! आपण उगीचच विचारलं तिला. तिची आई नाहीं म्हणून तर तिचे बाबा एकटे येतात...पण आपले डॅडी ममी तर......विचाराची गाडी पुढें चालेनाच! फ्रेनीचे डॅडी आले. ती पळत पळतच गेली. आणि बिचारा राजू एकटाच राहिला! डॅडी ममी विषयीं विचार करीत......एकदम त्याच्या मनांत कांहींतरी चमकलं आणि तो धांवतच आपल्या खोलींत गेला. भरकन् लेटर पॅड काढलं आणि पत्र लिहू लागला.

'डियर डॅडी...तुम्ही मला न्यायला एकटं यायचं नाहीं. You and mammy must come together, अगदीं जोडीनं. नाहींना मी सिस्टर डॉरिन जवळच राहीन. बघा हं...मी तुमच्याशीं मुळींच बोलणार नाहीं.'

एक पत्र तयार झालं! दुसरं असंच धमकीवजा पत्र ममीसाठीं लिहिलं. झटकन् दोन्ही पत्रं पाकिटांत कोंबून राजू सिस्टर डॉरिनच्या ऑफिसशीं गेला......

ऑफिसच्या झुलत्या दाराच्या खालून त्याला कुणाचे तरी पाय दिसले. तो थबकला. निळ्या रंगाची पॅंट आणि नॉयलानची निळी साडी...त्याला दिसली...कुणीतरी बोलत होतं......

'नको रे तूं असं करूस...त्याला फार वाईट वाटतं...त्याच्या health वर परिणाम होतो....आपण राहूं या एकत्र...राजूकरितां Just for our Raju's sake...

हो हो For Rajus sake अरेच्या हा तर ममीचा आवाज आणि डॅडी ही बरोबर! धाडकन् दरवाजा उघडून राजू आंत शिरला. आणि पाठमोऱ्या डॅडी ममीच्या मध्यें जाऊन त्याने त्याना दोन्ही हातानी घट्ट घट्ट धरून टाकले. तो डॅडी, मर्मी...म्हणत म्हणत त्याने त्या दोघांना घट्ट आवळून धरलं...त्याच्या मनांत आलं. आतां कोण माझ्या डॅडी ममीची जोडी फाडेल! कोण फोडेल?

दोन्ही बाजूला दोन पाकिटं पडली होती आणि डॅडी ममीच्या मध्यें राजू झोके घेत होता...

●७●

# "पसरणें" ही चीनची वृत्तीच आहे!

देशोदेशीचे व्यापारी जगांतील निरनिराळ्या प्रदेशांत व्यापार करतात. कांहीं दिवसांनीं स्थानिक व्यापाऱ्यांच्या हातांत कारभार देऊन हे व्यापारी आपापल्या देशांत निघून जातात. पण चिनी व्यापारी मात्र असं करीत नाहीं. त्यानें एकदां हात पसरला कीं, मागे जाण्याऐवजीं, पुढें होऊन तो आपला पाय पसरतो. कांहीं दिवसांनीं तो चिनी शेतकऱ्याला आपल्याबरोबर आणतो. तीन हजार वर्षांपूर्वी चीन नखुरड्याएवढं राज्य होतं. हल्लींच्या फ्रान्स-पेक्षांहि लहान. त्यानतर पांचशें वर्षांनीं त्याच्या सीमा यांगत्सी नदीच्या दक्षिणेपर्यंत जाऊन पोहोंचल्या; आणि इ. स. सुरू होण्या-पूर्वी आपल्या तथाकथित 'भाई–भाई'च्या ढोंगाखालीं त्यांनीं कॅन्टॉनपर्यंत आपली हद्द वाढविली. आपल्या डोळ्यादेखत त्यांनीं आग्नेय आशियामध्यें इंचाइंचासाठीं चिनी लोंढे धाडले. (आणि आजही आपल्या डोळ्यांदेखत ते उत्तर सीमेवर धडका देत आहेत) वास्तविक पाहतां सिंगापूर इंग्रजांनीं शोधून काढल असावं पण आज तें एक 'चिनी शहर' म्हणून ओळखलं जातंय्. पूर्वी तें धंद्यांत शिरून त्या मार्गें आक्रमण करीत, आज फौजा पाठवून आक्रमणाचा पाठपुरावा चाललाय्. कित्येक प्रसंग त्यांच्या जिवावर बेतणारे ठरले, पण त्यांची खोड जात नाहीं. चिनी लोंढा वेळींच थोपविला नाहीं तर पुढें ती एक डोकेदुखी ठरते हा प्राचीन अनुभव आहे.

**अर्नोल्ड टॉयनबी**
East To West मध्यें

पान १० वरून

ह्या संकटाच स्वरूप सौम्य न समजता यास खंबीरपणें तोंड दिलें पाहिजे. या न्याय्य लढ्यावर आपला विश्वास असला पाहिजे. हा लढा दंतांना विजय आपलाच आहे याची खात्री असूं द्या. अफवांवर विश्वास ठेवूं नका. कमकुवत मनाच्या लोकांचें ऐकूं नका. आपल्या सर्वांच्या कसोटीची ही वेळ असून या वेळीं आपण पोलादाप्रमाणें मजबूत राहिले पाहिजे. स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं सतत जागरूकता, सामर्थ्य व कडक शिस्त या गोष्टींची आवश्यकता आहे.

**भवितव्याबद्दल विश्वास बाळगा**

आपल्यावर हा लढा लादला गेला आहे. अशा वेळीं धर्म, पक्ष आणि गट यांचा विचार न करता लोकांनीं या लढ्यांत सहभागी व्हावें अशी मी त्यांना विनंती करतो. माझा आपल्या लोकांवर, ते करीत असलेल्या कार्यावर आणि देशाच्या उज्ज्वल भवितव्यावर विश्वास आहे. कदाचित भविष्यकाळांत आपली कसोटी पणास लावावी लागेल आणि सध्यापेक्षां अधिक खंबीर भूमिका घ्यावी लागेल.

आपण अलिप्ततेचें धोरण स्वीकारलें असून सर्व राष्ट्रांशीं आपलें मित्रत्वाचे संबंध आहेत. या धोरणावर माझा संपूर्ण विश्वास आहे आणि हेंच धोरण आपण पुढें चालू ठेवूं. प्रस्तुतच्या अडचणी-मुळे आम्ही मूलभूत तत्वें सोडणार नाहीं. या धोरणाचा पाठपुरावा करूनच या संकटाला परिणामकारकरीत्या तोंड देण्यांत येईल; अशी माझी खात्री आहे.

भविष्यकाळांत येणाऱ्या कोणत्याही संकटाच्यावेळीं शौर्यानें लढा द्या आणि आपल्या देशाच्या भवितव्यावर विश्वास ठेवा हेंच आपल्याला माझें सांगणें आहे. ●●●










※ हृदयस्पर्शी वर्णन

—दत्तात्रय सोमण

※ असामान्य भाषाप्रभुत्व

—श्रीकृष्ण ठाकूर

※ सुबोध गीतें

—बाळ

## हृदयस्पर्शी वर्णनं

### एक डोळा बोलतो आहे

ले. —श्रीपाद काळे

(प्रः—मॅजेस्टिक बुक स्टाल, मुंबई ४. किं. ५रु.)

श्रीपाद काळे यानीं कांहीं यशस्वी कथा लिहिल्या आहेत. लघुकथा लेखनांतील यशा-मुळेच ते कादंबरीकडे वळले असावेत. 'एक डोळा बोलतो आहे' ही त्यांची पहिली कादंबरी.

कथेतील मध्यवर्ती व्यक्ति वसंत. त्याच्या-भोवती या कादंबरीचा पसारा मांडण्याचा लेखकाचा प्रयत्न. वसंताच्या जीवनांत उषा नांवाची (पूर्वी देखणी असलेली) पण आतां एक डोळा धड असलेली मुलगी येते. तशा त्याच्या आयुष्यांत आणखी दोन मुली येतात. दुसरीशी तो लग्न करतो. पण या तिनही स्त्रियांपैकीं कुठलीहि स्त्री संपूर्णपणें वाचकांची सहानुभूति मिळवीत नाहीं. उषाविषयीं कांहीं प्रमाणात दया निर्माण होते.

सबंध कादंबरीत एकही व्यक्तिरेखा—हृदय-स्पर्शी नाहीं. हृदयाला भिडेल असं एकहि चित्रण नाहीं. फक्त शेवटीं वसंताची पत्नी मेल्यावर वसंताची व त्याच्या दोन मुलांची वागणूक, हीं प्रकरणं श्री. काळे यांनीं अतिशय जिव्हाळ्यानें लिहिलीं आहेत.

शशिकांताचें प्रकरण हें ठिगळास रखें वाटतें. त्याला क्षय झाला आहे पण तो योग्य ते उपचार करून घेत नाहीं. कारण ? कोणतेंच नाहीं.

शशिकांताची भावजय त्याच्याशीं दुगव्यानें कां वागते ? कोणतेंहि समर्थनीय कारण नाहीं.

वसंताच्या बायकोच्या पोटांत रोग आहे. ऑपरेशन केलं पाहिजे असं डॉक्टर सांगतात. ऑपरेशन होते व ती मरते. हें सारं इतक्यात [illegible]कपणें आणि अलिप्तपणें सांगितलं आहे कीं तें पटत नाहीं. श्री. काळे यांनीं थोडे जास्त श्रम घेतले असते तर त्यांना हे दोष सहज दूर करतां आलें असते.

कादंबरीची भाषा सहज सुलभ आहे. कोंकणांतल्या एका भागाची हीं वर्णनं प्रादेशिक आहेत. चांगलीं आहेत. सबंध कादंबरी वाचल्यावर हाताला लागतं तें एवढंच.

श्री. काळे यांच्याकडून याहून चांगल्या, बांदेसूद कादंबरीची अपेक्षा आहे. प्रस्तुत कादं-बरी जरी एकाद्या लघुकथेची ओढून ताणून केलेली कादंबरी वाटली तरी ते यापुढें बांधेसूद सुस्पष्ट व्यक्तिलेखन असलेली कादंबरी लिहितील अशी आशा करूं या.

**दत्तात्रय सोमण**

●●●

## असामान्य भाषाप्रभुत्व

### निवडक कथा

लेः—पु. भा. भावे

(प्रकाशक : बा. ल. पाठक, मुंबई- २)

दीपावलीचे ख्यातनाम लेखक श्री. पु. भा. भावे यांच्या उत्कृष्ट अशा बारा कथांचा हा संग्रह प्रस्तावनेंत सौ. वसुंधरताईनीं सांगितल्याप्रमाणें भाव्यांच्या उत्कृष्ट अशा संग्रहामध्यें आणखी १०–१२ कथा सहज संग्रहीत करतां आल्या असत्या. परंतु प्रकाशकांना ठराविक मर्यादेपुढें जातां येत नाहीं म्हणून त्यांना या बारा कथांवरच समाधान मानावें लागलें.

या संग्रहांतील साऱ्याच कथा एकाहून एक सरस आहेत. 'सतरावें वर्ष', 'मुक्ति' 'स्वप्न', या कथा कितीहि वेळ वाचल्या तरी समाधान होत नाहीं.

श्री. भावे हे कथा लिहितांना त्या कथेशीं, कथापात्रांशीं इतके एकजीव होतात कीं त्यामुळें आपल्याला कथा वाचतांना त्यात मुळीच परकेपणा—अलिप्तता वाटत नाहीं. वाचकांच्या भावनांच्या तारा हळुवार हातानें छेडण्याचें हें कौशल्य फारच थोड्यांना जमतें.

भाषेवर असामान्य प्रभुत्व हा भाव्यांचा मोठा गुण. भाव्यांच्या साऱ्या साहित्य-संपदेत वावगा शब्द शोधून काढणें कठीण. ती स्वप्ना-सारखी काव्यमय आहे. रसपूर्ण आहे.

गेल्या वीस वर्षांतील मराठी लघुकथाकारांत भाव्यांचें स्थान आघाडीचें. त्यांची शैली निराळी. साचा निराळा. भावे हे जसं कुणाचे शिष्य नाहींत तद्वत् सहीसही भाव्यांची नक्कल करणंहि कुणाला जमलेलं नाहीं—जमणारं नाहीं.

ते नवकथाकार कीं जुन्या पठडीतल हा वाद बाजूला ठेवला तरी कथाकार म्हणून भावे यांच स्वतःचें स्थान निर्विवाद आहे. मराठी लघुकथेच्या अभ्यासकाला भाव्यांच्या कथांचा विचार एक स्वतंत्र प्रकरण ठेवूनच करावा लागेल.

**—श्रीकृष्ण ठाकूर**

●●●

## सुबोध गीतें

### छुमछुम्

—कवि : सूर्यकांत खांडेकर

प्रकाः—ओरिएंट लाँगमन्स. किं. रु.१-७५ न. पै.

सूर्यकांत खांडेकर हे नव्या पिढीचे कवि. विविध विषयांवर सफाईनें काव्यरचना करण्यांत त्यांचा हातखंडा. कवि रविंद्रनाथांच्या कांहीं गीताचा त्यांनीं केलेला सरस पद्य अनुवाद दीपावलींतून प्रसिद्ध झालेला आहे.

आतां श्री. खांडेकर हे बालगीतांच्या प्रांतांत उतरले आहेत. लहान मुलांना आवडतील व रुचतील अशीं बालगीतें त्यांनीं लिहिलीं व चित्रकार गोलिवडेकर यांनीं त्या गीताना योग्य अशीं चित्रें काढलीं. खांडेकरांच्या या संग्र-हास महाराष्ट्र सरकारनें बालवाङ्मयाचें पारि-तोषिक देऊन गौरविलेलें आहे.

प्रकाशकांनीं पुस्तक अतिशय सुंदर तऱ्हेनें प्रसिद्ध केलें आहे. कवि व प्रकाशक दोघेही कौतुकास पात्र आहेत.

**—बाळ**

●●●






# साहित्य-स्वीकार

१ भाग्यविधाता अणु,-यदुनाथ थत्ते,
श्रीराम प्रकाशन, मुंबई-२ रु. १-७५

२ चोरवाटा-रमेश मन्त्री, श्रीराम प्रकाशन
मुंबई-२ रु. ३-००

३ अमृतधारा-यदुनाथ थत्ते,
श्रीराम प्रकाशन, मुंबई-२. रु. २-००

४ चवथीचा चांद-विनायक द. साळगांवकर,
तुला प्रकाशन, पुणें-२. रु. २-००

५ भावनांचें विश्व-रमेश द. पाटील,
विद्या प्रकाशन, नांदुरा. रु. १-७५

६ संवेदना-सं. सुधाकर लोखंडे, सौ. सुलभा
लोखंडे, आत्माराम भोयर,
सुलभा प्रकाशन, गोंदिया. रु. १-००

७ आकाश लहरी-श्रीनिवास बनहट्टी,
सुविचार प्रकाशन, मंडळ धंतोली,
नागपूर. रु. ३-००

८ न उलगडलेलें कोडें-रामचंद्र हिंगणे,
नलिनी साहित्य प्रकाशन, पुणें २. रु. २-००

९ अतर-बलराम नांगरे,
गं. रा. पाठक, सदाशिव, पुणे-२ रु. २-००

१० शक्तिकेतु,
गं. रा. पाठक,
गं. रा. पाठक-सदाशिव, पुणें-२. रु. १-००

११ व्रती- अरविंद गोखले.

१२ मराठी नाट्यसंगीत, संपाः-बाळ सामंत,
बा. ल. पाठक प्रकाशन, रु. ०-५०

१३ विरंगुळा- द. मा. मिरासदार, मौज
प्रकाशन, मुंबई-४

१४ रथचक्र-श्री. ना. पेंडसे-मौज प्रकाशन
मुंबई-४

१५ स्वप्नजा-पद्मा, मौज़ प्रकाशन.मुंबई-४

**भारतीय ग्रंथभवन** (नायगांव) यांजकडून.

१ चित्तशुद्धतरी-श्री. केळुसकर, साहित्य
सहकार प्रकाशन, रु. २-००

२ प्राचीन मराठी कविता, खंड १
ज. श. देशपांडे, मुं.म.ग्रं. संग्रहालय, रु. ३-००

३ भाववंदना, मुं. म. ग्रं. संग्रहालय रु. २-५०

४ मराठे व निजाम-सेतु माधवराव
पगडी रु. ७-००

५ पानिपतचा संग्राम, से. मा. पगडी
रु. ५-००

६ घाशीराम कोतवाल,
मो. कान्होबा रु. ४-००

७ मुंबईचें वर्णन,
गो. ना. मडगांवकर ८-००

८ मराठी दोलामुद्रितें,
स. आ. गावस्कर, मु.म.-ग्रंथसंग्रहालय रु. ५-००

---

२४ मर्ढेकरांच्या कादंबऱ्या
बा. सि. मर्ढेकर, मौज प्रकाशन, मुं. ४, रु. ६-००

२५ अस्ताई, केशवराव भोळे, मौज
प्रकाशन, मुं. ४ रु. ६-००

२६ आशा परत येते
-ज. ग. देवकुळे, मकरंद साहित्य, रु. १-००

२७ शिवप्रताप-जगदीश दळवी ललितनाट्य
प्रकाशन, मु. १२ रु. २-००

२८ पाचोळा- जगन्नाथ टंकसाळी,

२९ प्रद्युम्न टंकसाळी
हिन्दी प्रचार संघ मुधोळ रु. १-५०

३० द्राक्षवेल- सि. पु. वालावलकर, कोकण
वैभव प्रकाशन, मुं. ७ रु. १-५०

●●●

---



# काया कल्प

अमावास्येच्या घनतिमिरांत उगवलेल्या दीपकलिके! विजेरी दिव्यांच्या मायावी झगमगाटांत तुझें आगळं सौंदर्य किती उठून दिसतं आहे! मंदपणें तेवतांना तुझ्या सात्त्विकतेचं तेज-हवल्याशा जागेंत का होईना-झळाळतं आहे, मंगलतेचा साक्षात्कार घडवतं आहे.

दीपकळी, आम्ही यायचं का तुझ्याजवळ! हे दोन हात तुझ्या सान्निध्यांत यायला कसे अगदीं आसुसले आहेत. हें काय! असं थरथरायला काय झालं! रागावलीस वाटत! कधींकधीं हेच हात घाणीनं बरबटतात, दुष्कृ यें करतात आणि क्षमायाचना करायलाहि हेच हात पुढें असतात म्हणून का तूं रागावलीस! स्वतःच्या तेजानें स्वतःच आंधळी होशील तूं!! ज्या आसनावर तूं आतां डौलानें मिरवते आहेस तें आसन याच हातांनीं घडवलं आहे हें कदापीहि विसरूं नकोस. मातीनं बरबटलेल्या याच हातांतून भव्य प्रासाद, सुंदर सुंदर उपवनें, भव्य निएकाहून एक अशा महान कलाकृति निर्माण झाल्या. याच हाताच्या कारागिरींतून जगाच्या कल्याणासाठीं जन्माला आलेलीं यंत्रं, धरणें निर्माण झालीं. याच हातांच्या जादुगिरींतून विश्व नटलं, सजलं, मोठं झालं.

स्वतःच्या मोठेपणाचा डंका पिटून आम्हांला तुला हिणवायचं नाही. तुझा मोठेपणा आम्ही जाणून आहोंत. अंधारांत चांचपडणाऱ्या दीनदुबळ्यांचा तूंच आधार आहेस, तुफानांतल्या नौका दीपाच्याच आधारानें वाटचाल करतात, तुझ्याच आधारानं ज्ञानदीप खुलतो, हें सारसारं आम्हांला ठाऊक आहे. पण त्याकडेहि दुर्लक्ष करून तुला चारचौघांत रखं असं हिणवतां येईल कीं तूं जळत नाहींस, तुझं तेल जळतं आणि त्या तेलाच्या त्यागावर तूं स्वतः फुकटची मिरवते आहेस. पण आम्हाला तसं कांहीं एक करायचं नाहीं. कारण तें क्षुद्रतेचं लक्षण ठरेल. लोखंडाचा तुकडा अग्नींत पडून जो भडका उडतो त्यालाहि अग्नीच म्हणतात हें नाकारण्यांत काय अर्थ आहे! परीसाच्या स्पर्शानें लोखंडाचं सोनं बनतं तर तूं तेलांतून दिव्यता निर्माण करतेस.

हें काय! केवढा हा वारा आला! थांब, दीपकली थांब. अशी बावरूं नकोस, फडफडूं नकोस आणि भीतीनं पिवळीफडक पडूं नकोस. आमच्या आधारानं तुला जगायचं आहे की खोट्या प्रतिष्ठेच्या आहारीं जाऊन तुला मरून जायचं आहे! आधार घेतल्यावांचून या जगांत कधीं कुणाचं चाललंय! भूमावरून सरपटत जाणाऱ्या वेलीला उंच उंच जायचं असेल तर तिला वृक्षाचाच आधार घ्यावा लागतो. थांब! पुन्हा पुन्हा

पान ४८ वर




- यशवंतराव चव्हाण
- विजयालक्ष्मी पंडीत
- कन्नमवार
- चीनचे आक्रमण
- सातारा साहित्य संमेलन
- जॉन स्टाइन बेक
- कै. अण्णासाहेब कर्वे
- कलाकार जागा झाला

## राजकारण

### श्री. यशवंतराव चव्हाण

महाराष्ट्राच्या कर्तबगारीचें आणि धैर्य, शौर्य, प्रखर राष्ट्रीयत्व आणि लढाऊ वृत्तीचें जाज्वल्य प्रतीक म्हणुन ज्यांना मानता येईल असे महाराष्ट्राचे लोकप्रिय मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण ह्यांच्याकडे भारताच्या संरक्षणखात्याची जबाबदारी सुपूर्द करण्यात आली हें सर्वतोपरि उचित झालें. यशवंतरावांच्या प्रस्तुत नियुक्तीची सूचना ज्येष्ठ पुढाऱ्यांनीं व अन्य प्रादेशिक नेत्यांनीं केली व तिचें हार्दिक स्वागत तमाम जनतेनें केलें हें अपूर्व आहे. यशवंतरावांनीं एकनिष्ठ देशसेवक म्हणून कॉंग्रेसच्या छत्राखालीं केलेल्या कार्याचें चीज होऊन त्यांना वर्किंग कमिटींत स्थान मिळालें तसेंच मुंबईच्या जुन्या मंत्रिमंडळांतही त्यांचा अंतर्भाव झाला. मोरारजी दिल्लीस गेल्यानंतर द्विभाषिक राज्याचे मुख्यमंत्री म्हणून त्यांची नियुक्ति झाली ती त्यांच्या कुशल मुत्सद्दगिरीमुळें, चतुर संघटकवृत्तीमुळें आणि खंबीर कार्यक्षमतमुळें, ह्या आणीबाणीच्या काळांत तारेवरची कसरत करण्याचे अनेक प्रसंग त्यांच्यावर आले व प्रसंगावधानी मनोवृत्तीमुळें ह्या दिव्यांतून ते तावून सुलाखून बाहेर पडले. ह्या त्यांच्या नेत्रदीपक नेतृत्वामुळें एकसंध महाराष्ट्राचें मुख्यमंत्रीपद त्यांच्याकडे चालत आलें. इतकं यश सहज प्राप्त होऊनही यशवंतरावांनीं सौजन्य, नम्रता व सहिष्णु वृत्ती न सोडतां उलट हे गुण वृद्धिंगत करून जनतेला खऱ्या लोकशाही राज्याची प्रतक्षांत ओळख करून दिली. स्वपक्षीयांना त्यांनीं जसें सहज जवळ केलें तसेंच परपक्षीयांकडे ते आपणहून आदरानें पुढें गेले. बहुसंख्य जनतेंत सहजपणें मिसळून जाण्याचें धोरण ठेवून ते लोकांचे, लोकांसाठीं व लोकांतलें नेते झाले. विरोधी पक्षांना स्नेहाचा हस्त पुढें करून त्यांनाही निगडित करण्यांत ते यशस्वी ठरले. आपल्या कार्यक्षम राज्यकारभार पद्धतीनें महाराष्ट्र राज्याची घडी अल्प काळांतच इतक्या ठाकठीकपणें बसविली असल्यामुळें त्याच्याकडे मध्यवर्ति सरकारचें व भारतातल्या इतर ज्येष्ठ पुढाऱ्यांचें लक्ष जाणें स्वाभाविक होतें. मध्यवर्ति सरकारमध्यें त्यांचा अंतर्भाव करण्याच्या वावड्या ह्यापूर्वी अनेक वेळां उठल्या होत्या. पण सध्यांच्या आणीबाणीच्या काळांत संरक्षण मंत्र्यांचें अत्यंत बिकट, महत्वाचें व जबाबदारीचें स्थान त्यांना देण्यांत त्यांच्या अपूर्व कार्यक्षमतेचा गौरव झाला हें विशेष आहे. यशवंतरावांनीं हें गौरवपद थोड्याशा नाखुषीन स्वीकारलें. कारण महाराष्ट्राच्या जडणीघडणीला शिस्तप्रद वळण लावून एकसंध अविरोधी सर्वांगीण प्रगतीचें त्यांचें स्वप्न नुकतेंच कुठें सुफलित होत होतें. पण पोटच्या पोराच्या लग्नापेक्षा कोंडाण्याचें लग्न आधीं लावण्यास सिद्ध झालेल्या तानाजीचे यशवंतराव वंशज असल्यामुळें राष्ट्राची हांक तत्काळ स्वीकारणें त्यांना इष्ट वाटलें व कृतकृत्य महाराष्ट्रानेंही त्याच्या ह्या गौरवास योग्य साथ दिली. यशवंतरावांच्या ह्या एकमुखी निवडीमुळें त्यांच्या पुढील कार्यात अधिक आत्मविश्वासानें तें पाऊल टाकतील एवढेंच नव्हे तर संरक्षण खात्यांत त्यांच्या संघटन-कौशल्याची, कणखर धोरणाची व दूरदर्शी नेतृत्वाची छाप पडेल ह्यांत संदेह नाहीं "शुभास्ते पथानः" असेंच यशवंतरावांचे सर्व चहाते व महाराष्ट्राचे नागरिक त्यांना म्हणतील. आम्हीही त्यांना त्यांच्या नवीन कार्यक्षेत्रांत सुयश चिंतितों.

× × ×

### विजयालक्ष्मी पंडित

महाराष्ट्राचे माजी राज्यपाल डॉ. पी. सुब्बरायन ह्यांच्या निधनामुळें रिकाम्या झालेल्या जागीं श्रीमती विजयालक्ष्मी पंडीत ह्यांची नियुक्ति करण्यांत आली आहे. डॉ. सुब्बरायन् ह्यांचें निधन ऑक्टोबर महिन्यांत झालें. तत्पूर्वी प्रकृतीच्या अस्वास्थामुळें ते मद्रासला कांहीं महिने राहिले होते व कदाचित् राज्यपालपदावरून निवृत्त होण्याची त्यांची मनीषा होती. कारण श्रीमती पंडित ह्यांच्या प्रस्तुत राज्यपालपदाच्या नियुक्तीबद्दलचा उल्लेख सुमारें सहा महिन्यापूर्वींच मुंबईतल्या एका सभेंत केला गेला होता. पण मध्यांतरांत आणि विशेषतः सुब्बरायन्‌च्या निधनानंतरही दीड महिना ही नियुक्ति लांबणीवर पडली. विजयालक्ष्मींची ही नियुक्ति स्वागतार्हच आहे असें म्हणतांना केवळ त्या पंतप्रधानांच्या भगिनी आहेत एवढेंच त्यांचें महत्व नाहीं. आपल्या पित्याच्या व बंधूच्या पावलावर पाऊल टाकून १९३०सालापासून त्यांनीं स्वातंत्र्याच्या चळवळींत हिरीरीनें भाग घेतला व कारावासहि भोगला.








स्वातंत्र्यपूर्व नजीकच्या काळांत उत्तर प्रदेशच्या मंत्रिमंडळांत त्या आरोग्य व स्थानिक स्वराज्य खात्याचें मंत्रिपद भूषवित होत्या. स्वातंत्र्यानंतर अमेरिका व रशियांत भारताच्या वकील म्हणून जबाबदारीनें त्यांनीं केलेलें काम उल्लेखनीय आहे. तदनंतर इंग्लंडमध्यें हाय-कमिशनर म्हणून त्यांची नियुक्ति झाली तसेंच संयुक्त राष्ट्रांच्या आमसभेचें अध्यक्षपदही त्यांना प्राप्त झालें हें विशेष होय. विशेषतः दक्षिण आफ्रिकेंतल्या नीग्रो जमातीच्या हक्कांसाठीं त्यांनीं घेतलेली ठाम भूमिका त्यांच्या कारकिर्दीचा एक अविस्मरणीय मानबिंदु मानतां येईल. विजयालक्ष्मीचें व्यक्तिमत्व जितकें आकर्षक आहे तितकेंच त्यांचें सफाईदार वक्तृत्वही परिणामकारक आहे. आज वयाच्या बासष्टाव्या वर्षीदेखील त्यांचा उत्साह आणि कार्यक्षमता अवर्णनीय आहे. भारतांतल्या राज्यांत महाराष्ट्राचें महत्त्व अनन्यसाधारण आहे. महाराष्ट्राची राजधानी मुंबई ही फक्त बहुरंगी व बहुढंगी नसून जागृत आणि कार्यतत्पर आहे हें प्रचलित परकीय आक्रमणाला तिनें दिलेल्या तनमनधनाच्या सादेवरून स्पष्ट झालें आहे. अशा ह्या महाराष्ट्राच्या राज्यपालपदीं विजयालक्ष्मींची झालेली ही नियुक्ति त्यांच्या अष्टपैलु व्यक्तिमत्वास पोषक ठरेल ह्यांत संदेह नाहीं. महाराष्ट्रीय घराण्यांशीं संबंधित असूनही त्या आजपर्यंत त्या महाराष्ट्राला दुरावल्या होत्या. प्रस्तुत नियुक्तीनें महाराष्ट्राशीं त्यांचा संबंध निगडित होऊन त्या प्रचलित आणीबाणीच्या प्रसगीं आपल्या धीरोदात्त नेतृत्वानें महाराष्ट्राला मार्गदर्शन करतील अशी खात्री वाटते.

× × ×

### श्री. मारोतराव कन्नमवार

महाराष्ट्राचे नवे मुख्यमंत्री म्हणून श्री. मारोतराव कन्नमवार यांची एकमतानें निवड झाली व गेल्या महिन्याच्या एकवीस तारखेला त्यांनीं आपल्या कामाचा ताबा घेतला. ही निवड जाहीर होण्यापूर्वीं प्रस्तुत महत्त्वाच्या पदावर होणाऱ्या नियुक्तीबद्दल अनेक वावड्या उठल्या होत्या. विशेषतः मंत्रिमंडळांत आणखी कांहीं अनुभवी व ज्येष्ठ उमेदवार असतांना अमुक एका व्यक्तीची निवड होईल असें खात्रीनें सांगणें कठीण होतें. पण यशवंतराव चव्हाणांना महाराष्ट्र कॉंग्रेसनें सर्वाधिकार देऊन आपला वारस नेमण्याची व एकमतानें त्यांच्या निवडीचा पाठपुरावा करण्याची हमी घेतल्यामुळें ही निवड सुलभ होऊं शकली. कन्नमवार ह्यांचा जन्म १९००सालीं चांदा जिल्ह्यांत झाला. त्यांचे घराणें शेतकऱ्याचें- गरिबीमुळें त्यांना शिक्षण घेणें जमलें नाहीं तरिपण आपल्या ध्येयनिष्ठेनें व दीर्घोद्योगानें कन्नमवारांनीं आपलें जीवन यशस्वी करून दाखविलें. लहानपणीं वर्तमानपत्रें विकण्याचा व्यवसाय त्यांना करावा लागला होता. पण वर्तमानपत्रें विकणारा हा पोऱ्या नुसत्या विक्रीवर उपजीविका करण्यांत इतिकर्तव्यता मानत नव्हता तर जनतेच्या ज्ञानांत भर पडावी म्हणून एका फळ्यावर दररोज महत्त्वाच्या बातम्या खडूनें लिहून एकपरीनें ज्ञानप्रसाराचें कार्य करत होता. तरूणपणांतच त्यांनीं समाजसेवेची दीक्षा घेतली व अनेक लोकोपयोगी कामें कळकळीनें केली. एक निष्ठावंत सेवक म्हणून त्यांनें कॉंग्रेसमध्यें प्रवेश केला व स्वातंत्र्याच्या चळवळींत विधायक भाग घेतला खेड्यापाड्यांत जाऊन हिरीरीनें कॉंग्रेसचा प्रचार केला व व्याख्यानें देऊन स्वातंत्र्यसंग्रामांत जागृति केली. १९२३ सालीं व पुढें १९४१ सालीं त्यांना कारावास भोगावा लागला. १९३८ सालीं ते ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीवर निवडून आले व आजतागायत ते तिचे मान्यवर सदस्य आहेत. १९३९ ते १९४८ पर्यंत नागपूर प्रदेश कॉंग्रेस समितिचे ते चिटणीस व १९४८ ते १९५२ पर्यंत अध्यक्षहि होते. १९५२ च्या सार्वत्रिक निवडणुकींत चांदा जिल्ह्यांतून मध्यप्रदेश विधानसभेवर निवडून आले व मंत्रिमंडळात त्यांचा अंतर्भाव होऊन आरोग्य व तुरुंगखातीं त्यांच्याकडे सुपूर्द करण्यांत आलीं. राज्यपुनर्रचनेनंतर १९५६ सालीं मुंबई राज्याच्या मंत्रिमंडळात त्यांना निवडण्यांत येऊन त्यांना आरोग्यखातें देण्यांत आलें. १९५७ च्या निवडणुकींत चांदा जिल्ह्यांतून मुंबई विधानसभेवर ते निवडून आले व सार्वजनिक आरोग्यखात्याचा ताबा त्यांनीं स्वीकारला. महाराष्ट्र राज्यस्थापनेनंतर ते इमारती व दळणवळण खात्याचे मंत्री झाले व यापूर्वीच्या मंत्रिमंडळांत उपमुख्य मंत्री झाले. कन्नमवारांचे ह्या राजकारणाव्यतिरिक्त शैक्षणिक कार्यहि उल्लेखनीय आहे. १९२३ सालीं चांदा येथें त्यांनीं नवभारत विद्यालय स्थापन केलें. सध्यां ह्या विद्यालयाचे नामाभिधान 'गांधी विद्यालय' असे असून विद्यालय चालवणाऱ्या संस्थेचे कन्नमवार हे अध्यक्ष आहेत. कन्नमवारांचा वृत्तपत्रांशी संबंध विक्रेते ह्या नात्यानें प्रथम आला असला तरी वृत्तपत्रव्यवसायाबद्दल त्यांना फार आकर्षण होतें. १९३४ सालीं लोकसेवक व १९४८ सालीं नवसंदेश ही साप्ताहिकें व १९५३ सालीं ग्रामसेवक हे मराठी मासिक त्यांनीं सुरू केलें. ह्या सर्व नियतकालिकांच्या फाइली त्यांनीं मोठ्या निष्ठेनें जपून ठेवल्या आहेत. गोड व निगर्वी स्वभाव, खेळीमेळीनें जनतेंत मिसळणें व वेळ प्रसंगीं स्पष्ट शब्दांत कानपिचक्या देणें अशा वृत्तीनें कन्नमवारांनी लोकसेवा केली. संघटनात्मक कार्यक्षमतेमुळें कॉंग्रेसमध्यें ते जसे विशेष चमकले तसेंच शासनविषयक व्यवहारचातुर्यानें मंत्रिमंडळांत व खात्यांतही ते लोकप्रिय ठरले. कन्नमवार हे नागविदर्भाचे ज्येष्ठ नेते आहेत व ह्यामुळें आतांपर्यंत काबूत ठेवलेल्या स्वतंत्र विदर्भवाद्यांच्या चळवळीला त्यांच्या प्रस्तुत गौरवानें कदाचित् कायमची मूठमाती मिळेल. ज्या संघटनाचातुर्यानें, खंबीरपणानें व व्यवहारकुशलतेनें त्यांनीं जीवनास झुंज दिली त्याचेच प्रसादचिन्ह म्हणजे त्यांची प्रस्तुत एकमतानें झालेली नियुक्ति असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. यशवंतराव चव्हाणांनीं आखून दिलेल्या प्रगतीच्या मार्गावर महाराष्ट्र राज्यास नेण्यास ते समर्थ ठरतील असा त्यांच्याबद्दल आत्मविश्वास वाटतो. श्री. कन्नमवारांचे आम्ही हार्दिक अभिनंदन करतों. व त्यांच्या जबाबदारीच्या कार्यांत सुयश चिन्तितों.

× × ×

### चीनचें आक्रमण

गेल्या सप्टेंबरमध्यें चिनी फौजांनीं मॅकमहोन रेषेचा भंग करून विश्वासघातकीपणानें भारतीय प्रदेशांत मोर्चे बांधण्यास सुरवात केली व त्यामुळें भारत सरकारला आजपर्यंतचा सौम्य व समजुतदार पवित्रा टाकून आक्रमकांना हुसकावून लावण्यासाठीं सैन्य संचालन करावें लागलें. चीनच्या नकाशांत दर्शविलेला मॅकमोहन रेषेच्या पलिकडचा नेफा व लडाख-









मधला पन्नास हजार चौरस मैलांचा विस्तृत प्रदेश ऐतिहासिकदृष्ट्या चीनचाच असून ब्रिटिश साम्राज्यवाद्यांनीं तो चीनपासून हिरावून घेतला व आतां भारतीय विस्तारवादी नेत तो मुलुख गिळंकृत करून समझोत्यानें तो परत देण्यास तयार नसल्यामुळें चीनला हा हल्ला करावा लागत आहे असा कांगावा करून प्रस्तुत आक्रमणाचें समर्थन चीन करीत आहे. गेलीं कांहीं वर्षें चीनच्या कम्युनिस्ट राज्यकर्त्यांनीं अष्टविध प्रगतीच्या अवाढव्य हव्यासापायीं जनतेला क्रूरपणें राबवून जिचे रक्तशोषण केलें ह्यामुळें जनता आधींच असंतुष्ट आहे. तशांत गेल्या दोन वर्षांत पडलेल्या दुष्काळामुळें ही असंतुष्टता आणखीच वाढली आहे. जनतेची दृष्टि ह्या अंतर्गत वस्तुस्थितीवरून बदलण्यासाठीं ह्या तथाकथित परक्या आक्रमणाच्या संकटाचें निमित्त चीनला पुरेसें होतें व भारताच्या तटस्थ धोरणामुळें व शांतताप्रिय दुर्बलतेमुळें ह्या आक्रमणास सहजच यश प्राप्त झालें तर कम्युनिझमच्या साम्राज्य विरोधी चळवळीवर सुवर्णकलश चढून जगांत चीनचेही स्थान उंचावेल ह्या दुहेरी हेतूनें प्रस्तुत आक्रमण केले गेलें असावें असा अंदाज आहे. तसेच लोकशाहीवादी भारताला जागतिक राजकारणांत आपल्या सर्वांगीण प्रगतीमुळें जे उच्च स्थान प्राप्त झाले त्याचा चीनला हेवा वाटून ह्या प्रगतीला सुरूंग लावण्यांचा कुटिल डाव प्रस्तुत आक्रमणानें चीन साधत आहे असा तर्क करणे देखील सुसंगत ठरेल. तशांत गेल्या कांही वर्षांत चीनसारख्या बंधुराष्ट्राला उपेक्षुन भारतासारख्या विरोधी राजनीती राबवणाऱ्या देशाला रशिया जे सहाय्य करीत आहे त्याचा अप्रत्यक्ष सूड उगविण्याचा हेतूही ह्या आक्रमणाद्वारे सफल होणार आहे. आशिया खंडांत साम्यवादाचा अधिकार चालणार की लोकशाही नांदणार हाच प्रस्तुत लढ्याचा निष्कर्ष ठरणार असल्यामुळें अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स सारखीं लोकशाही राष्ट्रांनीं एकाकी भारताला अनाहूत व अपेक्षित सहाय्य देण्याचे आश्वासन दिलें आहे. भाईभाईच्या पंचशीलांत गुरफटून गेल्यामुळें भारताला चीनच्या आक्रमक हालचालीची धग जाणवली नाहीं व ह्यामुळें पहिल्या धडाक्यांत बेसावध भारताला माघार घ्यावी लागली पण राष्ट्रावरचें हें लाल संकट नेत्यांनीं ओळखल्यावर जनतला सज्ज राहण्याचें केलेलें आवाहन भारतीयांनीं संपूर्णपणें प्रतिसाद देऊन मान्य केलें व अल्प काळांतच तनमनधनें करून नेत्यांच्या धोरणाचा पाठपुरावा केला. ह्या अनपेक्षीत चढाईमुळें भारताला नेभळट मानणारा चीनही हतबुद्ध होऊन तडजोडीचे पवित्र टाकूं पहात आहे. ह्या तडजोडीच्या निमित्ताने आपल्यां आक्रमणाने गिळंकृत केलेला भूभाग तसूभरही न सोडतां उलट आपल्या तथाकथित मालकीचा मुलूख आणखी घशांत कसा पडेल व तसे करतांना आवश्यक साधनांच्या अभावी दुष्कर होत असलेली लढाई लवकर संपुष्टात आली तर चीनच्या आर्थिक व्यवस्थेला आणखी तडे जाणार नाहीत पण चीनच्या काव्यांना भारत ह्यापुढे फसणार नाही एवढच नव्हे तर 'शठं प्रति शाठ्यम्' ह्या न्यायाने चीनच्या चीनच्या ह्या अक्षम्य विश्वासघातकी चढाईचा पुरता निष्पाप करण्याचा निश्चय भारतीयांनीं केला आहे हे स्पष्ट सिद्ध झालें आहे. आज संबंध भारत एक प्रकारच्या विलक्षण संतापाने क्षुब्ध होऊन चीनची गुर्मी कशी उतरवावी ह्या विचाराने सर्व आघाड्यांवर ख्रिस्तीनें प्रयत्न करीत आहे. भारतीयांनीं पक्ष, जाती, धर्म व इतर भेदाभेद विसरून प्रस्तुत संकटकालीं एकजूट अबाधित राखावी ही नेहरूंची हाक भारताने अक्षरशः पुरी केली आहे. कम्युनिस्टांची धरपकड करून चिनी नागरिकांवर करडी नजर ठेऊन आणि विशेषतः मेननसारख्या आपल्या परमस्नेह्याची उचलबांगडी करून नेहरूंनीही जनतेच्या इच्छेला मान तुकविली आहे. देशाची सर्व आबालवृद्ध जनता स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या ह्या पहिल्या संकटाला तोंड देण्यासाठीं तनमनधने करून सज्ज झाली असल्यामुळें प्रस्तुत लढ्यात आपणास अखेर विजयप्राप्ति निश्चित होईल ह्यात संदह मुळींच नाहीं.

× × ×

पान ४५ वरून

आमच्या दिशेनें झेंप घेऊन अशी काकुळतीला येऊ नकोस. हें बघ आम्ही आलोच! आतां येऊं दे वारा, नाहींतर आणखी कांहीं तरी! दीपकळी, तेव, आतां पुन्हां नव्या जोमानें अशाच तेवत रहा.

गेला वारा. संकट पार झालं. आतां गेली ना भीति! घाबरूं नकोस तुला सोडून आम्ही कुठंच जाणार नाहीं. तुझ्याच सान्निध्यात आम्हाला रहायचं आहे. तुझ्या सहकार्याची आम्हांलाहि नितांत आवश्यकता आहे. आपल्या अभंग मैत्रींतूनच समृद्ध संसार उभारले जाणार आहेत, वृद्धांना दिलासा मिळणार आहे, बालकांना उज्ज्वल भवितव्याची वाट दिसणार आहे आणि दीनदुबळ्या विधवांचे अश्रु पुसले जाणार आहेत. कर्तव्यपालनासाठीं आपल्याला देशाच्या कानाकोपऱ्यांत जावं लागेल. हें कसं होईल हें तूं विचारतेस!

याचं उत्तर एकच...आयुष्याचं प्रतिक होऊन!

●●●

## साहित्य

### सातारा येथील साहित्य जत्रा

नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांत सातारा येथें ४४ वें मराठी साहित्य संमेलन निवृत्त राज्यपाल श्री.काकासाहेब गाडगीळ याच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. जुन-नवें साहित्यिक जमलें, पुष्कळ इतरहि गर्दी जमली आणि एका अर्थानें संमेलन गाजलें. अध्यक्षाचें भाषण उक्तींनीं भरलेलें आणि राजकारणाच्या रसायनात घोळवलेलें असें होतें; परंतु मराठी साहित्य संमेलनाच्या माजी अध्यक्षांपेक्षा तें कितीतरी बरें वाटलें. काकासाहबाचा मूळ पिंड राजकारणीच असल्यामुळें इतरांसारखें निदान उसनें अवसान तरी त्यांनीं आणलें नाहीं. केवळ दैवयोगानें अध्यक्षपद मिळालेल्या कांहीं माजी अध्यक्षाचा राजकारणाशीं तसा कांहींहि संबंध नव्हता; पण त्यांनीं देखील आपल्या अध्यक्षीय भाषणांत साहित्याऐवजीं राजकारणावरच भर दिल्याचें आढळतें. तें कालमानाप्रमाणें असलें तरी आजच्या आणीबाणीच्या काळांत साहित्य संमेलनाध्यक्षांनीं अवधान राखून योग्य मळ घातला असें म्हणणें भाग आहे. संमेलनांत दोन चर्चा झाल्या. एक, प्रकाशक-लेखक संबंध व त्यांचा वाङ्मय प्रसाराकडे विनियोग व दुसरा ग्रामीण वाचक व त्यांना लागणारें वाङ्मय याचा. पहिल्या चर्चेंत बोलले फक्त प्रकाशक. लेखकांपैकीं किंवा लेखकांच्या वतीन कुणीं बोलला नाहीं. अपवाद फक्त म मा वरेरकरांचा. प्रकाशकांतर्फे पॉप्युलर प्रकाशनाचे श्री. सदानंद








भटकळांचें भाषण अभ्यासू होतें. कळकळीचें होतें. त्यानंतरच्या प्रकाशक वक्त्यांनीं तेंच तेंच सांगितलें. त्यामुळें पुढच्या कांहीं नामवंत प्रकाशकांना फारसें बोलावयास मिळालें नाहीं.

दुसरी चर्चा ग्रामीण वाङ्मयासंबंधीं; ती फारच वरवरची झाली. ब्रिनीचे वक्ते शंकर पाटील. ते आजचे आघाडीचे ग्रामीण कथा लेखक आहेत. पण त्यांनी स्पष्टच सांगितलें कीं आपण फक्त ग्रामीण वाचकांसाठीं लिहितो असं नव्हे तर नागरी वाचकांसाठीं किंवा फक्त रसिकांसाठींच लिहीतों. शंकर पाटलांच्या या भूमिकेनें ती चर्चा साफ सपाट झाली.

संमेलनाची एक हौसेची बाब म्हणजे कवि-संमेलन. नूतन कवींनीं काव्यगायन करून आपल्याकडे काव्यहि नाहीं आणि गायनहि नाहीं याची प्रचिती श्रोत्यांना आणून दिली. जुन्या कवींनीं जुन्याच कविता म्हटल्या. कांहीं वृद्धांनीं सादर केलेलीं बालगीतेहि म्हटलीं गेलीं. सरिता पदकी–मनमोहन वगैरेंनीं कवि-संमेलनाची बाजू सांभाळली व श्रोत्यांना थोडा-फार दिलासा दिला.

अध्यक्षीय भाषण, अश्लील वाङ्मयाच्या निषेधाची चर्चा वगैरे गोष्टी सालाबादप्रमाणें झाल्या. पाहुणे मंडळी साताराहून घरोघर जावयास निघाली तव्हां हें सारं विसरली. हें विसरावेंच लागतें. नाहींतर पुढच्या वर्षी हेंच परत ऐकतांना आपण कांहींतरी नवीन ऐकत आहोंत असं कसं वाटेल !

साहित्य संमेलनाची यंदाची जत्रा संपली. भाऊगर्दीत सपली. गर्दी हेंच गमक मानायचं तर संमेलन यशस्वी झालं. चार दिवस, चार साहित्यिक एकत्र आले, मजेंत राहिले व परत आपापल्या कामावर गेले.

सातारकरांनीं संमेलनाची व्यवस्था मात्र अप्रतीम ठेवली होती. कांहीं उणें पडूं दिलें नाहीं. सातारकरांचें अभिनंदन.

× × ×

### जॉन स्टाइनबेक

यंदाचें वाङ्मयविषयक नोबेल पारितोषिक सुप्रसिद्ध अमेरिकन साहित्यिक जॉन स्टाइन बेक ह्यांना देण्यांत आल्याचें नुकतेंच स्टॉकहोमहून जाहीर झालें. अमेरिकन वाङ्मयांत हा बहुमान आतांपर्यंत सिंक्लेअर लुइस, पर्ल बक, युजेन ओनील, विल्यम फॉकनर व अर्नेस्ट हॅमिंग्वे ह्या पांच जणांना प्राप्त झाला होता. नोबेल पारितोषिक समिती १९५० पासून सतत पांचसहा वर्षे स्टाइन बेकचा विचार करीत होती पण अजूनपर्यंत त्यांच्याबाबत मतैक्य होत नव्हतें. डॉ. ऑस्टर लिंग ह्यांनीं समितीतर्फे यंदा पारितोषिकाची घोषणा करतांना स्टाइन बेकच्या कादंबऱ्यांतल्या अमेरिकन जीवनाच्या यथातथ्य चित्रणाचा उल्लेख करून त्याच्या ' ग्रेप्स् ऑफ रॅाथ ' व गेल्या वर्षीची ' ध विंटर ऑफ अवर डिसकंटेन्ट ' ह्या कादंबऱ्यांचा गौरव केला. जॉर्ज अर्नेस्ट स्टाइन बेक हे २७ फेब्रुवारी १९०२ रोजीं कॅलिफोर्नियांतल्या एका मुत्सद्याच्या पोटीं जन्मले. आपलें प्राथमिक शिक्षण सॅलिनॉस येथे १९१८ सालीं पूर्ण करून त्यांनीं स्टॅनफर्ड विद्यापीठांत उच्च शिक्षणासाठीं प्रवेश केला. मध्यंतरच्या काळांत शेतांतला मजूर, वृत्तपत्रविक्रेता, पहारेकरी आणि भटक्या जीवनाचे अनुभव त्यांनीं अनुभवले. १९२९ सालीं तीन कादंबऱ्या लिहिल्यानतर त्यांची ' कप ऑफ गोल्ड ' ही कादंबरी प्रकाशित झाली आणि नंतर आणखी दोन कादंबऱ्या प्रकाशित झाल्यानंतर १९३५ सालीं ' टॉर्टिला फ्लॅट ' कादंबरीमुळें ते विशेष प्रकाशात आले. १९३६ सालीं ' इन् डयुबिअस बॅटल् ', १९३७ सालीं ' ऑफ माइस् ॲन्ड मेन ', १९३८ सालीं ' ग्रेप्स् ऑफ रॅाथ ' अशा त्यांच्या कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. ह्या शेवटच्या कादंबरीमुळें पददलितांचा पुरस्कर्ता म्हणून स्टाइन बेकचें नांव गाजलें व त्यमुळें १९४० साली त्यांना सुप्रसिद्ध ' पुलिट्झर पारितोषिक ' देण्यांत आलें. दररोज दोन ते तीन हजार शब्द असे सतत दर आठवड्यास सहा दिवस लेखन लिहिणाऱ्या स्टाइन बेकच्या ' ग्रेप्स् ऑफ रॅाथ ', ' कॅनरी रो ', ' पास्चर्स ऑफ हेवन ', ' इस्ट ऑफ एडन ' व ' ध विंटर ऑफ अवर डिसकंटेन्ट ' ह्या कादंबऱ्या अमेरिकेंत तडाखेबंद खपल्या. एवढेंच नव्हे तर ' ग्रेप्स ऑफ रॅाथ 'चा अनुवाद जगातल्या तेहतीस भाषांत झाला. त्यांची ' मून ईज डाऊन ' ह्या कादंबरीचे बोलपटाचे हक्क तीन लक्ष डॉलर्सना विकले गेले. त्यांचे अगदीं अलिकडचें पुस्तक ' ट्रॅव्हल्स् विथ चार्ली ' हें अमेरिकन जीवनावरचे व पूर्वीचें ' रशियन जर्नल ' हें रशियांतल्या प्रवासवर्णनात्मक पुस्तक, त्यांतली सूक्ष्म दृष्टि, नर्म विनोद आणि परखड विवरण ह्यामुळें लोकप्रिय ठरलीं आहेत. अशा ह्या लोकप्रिय कादंबरीकारावर टीकाकारांनीं अनेक वेळा झोड उठवली पण तरीही त्यांच्या साहित्याच्या खपावर त्याचा कांहीही परिणाम झाला नाहीं. स्टाइन बेक हे अजूनही लिहीत आहेत आणि वयाच्या साठाव्या वर्षी मिळालेल्या ह्या जगन्मान्य गौरवामुळें त्यांच्याहातून आणखी चांगल्या कादंबऱ्या निर्माण होतील अशी आशा वाटते.

× × ×

## समाजकारण

### कै. अण्णासाहेब कर्वे

गेल्या महिन्याच्या ९ तारखेला सुप्रसिद्ध समाजसेवक, महिलांचे कैवारी व ' भाग्यवान् शतायुषी ' अण्णासाहेब कर्वे ह्यांचें निधन झालें. इंग्रज अमदानीच्या मध्ययुगांत महाराष्ट्रांत ध्येयनिष्ठ समाजसुधारकांची जी एक पिढी निर्माण झाली तिच्यांत अण्णासाहेबांचें कार्य व स्थान उच्च श्रेणीचें होतें. महिलांच्या खडतर दुःखांना आगरकरांनीं प्रथम तोंड फोडलें पण त्यांच्या अल्पायुष्यामुळें हें कार्य अपूर्ण राहण्याची धास्ती वाटत होती. अण्णासाहेबांनीं आपलें जीवन ह्या कार्यास वाहून घेऊन स्त्रियांच्या दास्यविमोचनाच्या चळवळीला एक अपूर्व नेतृत्व व चतुरस्त्र यश मिळवून दिलें. अण्णांच्या कार्यात आगरकरांची तडफ जरी दिसली नाहीं, तरी सातत्यानें व कुणाच्या स्तुति–निंदेची तमा न बाळगतां कार्यरत होण्याची त्यांची वृत्ति उल्लेखनीय होती. कोथरूडच्या माळावर एका क्षुल्लक झोपडींत सुरू केलेल्या पंचाहत्तर वर्षांपूर्वीच्या कार्याला विद्यापीठाचे व्यापक व मूर्तस्वरूप देण्यासाठीं अण्णा कळकळीनें झगडले हें लक्षांत घेण्यासारखें आहे. ज्या जनतेनें त्यांचे आरंभीचे हे प्रयत्न हास्यास्पद मानले. तिनेंचे ह्या कर्मयोगी व्यक्तीला नंतर शिरोधार्य मानलें. महर्षि ही जनतेची पदवी व ' भारतरत्न ' हा राष्ट्रीय किताब त्यांना ह्या अविरत सेवाव्रतानेंच त्यांना प्राप्त झाला. आपल्या उत्तरीं

बाळगलेल्या इच्छा–आकांक्षा आपल्या जीवन-कालांत पूर्णपणें सुफलित होण्याचें भाग्य कुणाला क्वचित्‌च लाभतें. अण्णांना हें भाग्य त्यांच्या दीर्घायुषी जीवनांत पुरेपूर उपभोगावयास मिळालें म्हणूनच त्यांना शतायुषी भाग्यवान मानण्यांत आलें. ' आधीं केलें मग सांगितलें ' ह्या न्यायानें १८९३ सालीं त्यांनीं स्वतः पुनर्विवाह करून मगच निवड्या छानीनें आपल्या तत्वांचा समाजांत पुरस्कार केला. विधवा विवाहाबरोच शिक्षणाचें महत्व जाणून स्त्रीशिक्षणाची चळवळ त्यांनीं अंगिकारली व महिला विद्यापीठाचें भव्य स्वप्न साकार करून दाखवलें. अशा आपल्या त्यागमय जीवनानें आणि निष्ठामय कर्तृत्वानें आपलें व समाजाचें जीवन उजळ करण्यांत यशस्वी झालेल्या अण्णांना दीर्घायुष्य लाभून महाराष्ट्रनिर्मितीची त्यांची अखेरची इच्छाही परिपूर्ण झाल्याचें समाधान त्यांना मिळालें. महाराष्ट्राच्या ह्या थोर महर्षींच्या स्मृतीला आम्ही नम्र अभिवादन करतों.

× × ×

## सत्यं. शिवं. सुंदरम्

### कलाकार जागा झाला

आक्टोबर महिन्यांत चीननें भारतावर आक्रमण कलें. राष्ट्रपुरुषानें भारतीय जनतेला हांक दिली. विराट भारत खडबडून जागा झाला. यच्चयावत भारतीयानं राष्ट्रपुरुषाच्या मागें आपण उभा असल्याची ग्वाही दिली. असंख्य संस्था, असंख्य व्यापारी, लहानमुलांसकट असंख्य स्त्री-पुरुष ' राष्ट्रीय संरक्षण निधि ' गोळा करण्यासाठीं सज्ज झालें. भारतीय कलावंतहि या बाबतींत मागें राहिला नाही. तोहि बध्दपरिकर झाला. नर, नर्तक, चित्रकार, शिल्पकार, कवि, लेखक इत्यादि कलावंत जीव कुर्बान करून राष्ट्राला मदत करण्यासाठीं तयार झालेले आहेत.

### हजारों रुपयांचा निधि

महाराष्ट्रांतील अनेक नाट्य-संस्थांनीं एकत्र येऊन मुंबई यथील रंगभवन येथें दशावतारी खेळापासून विकसित होत गेलल्या गेल्या सव्वाशें वर्षांचें रंगभूमीचें दर्शन घडवून जमलेला हजारों रुपयांचा निधि, संरक्षण फंडाला दिला. रुपेरी पडद्यावरील लहान मोठे कलावंत एकत्र झालें आणि त्यांनी दादरपासून मिरवणुक काढून उन्हांतान्हांतून रस्तोरस्ती फिरून साडेतीन लाखांच्यावर निधि जमविला.

चित्रकार-चित्रकारहि त्यापासून मागें राहिले नाहीं येथील ' भुलाबाई मॅमोरियल इन्स्टिटयूट ' या सस्थेनें तिथें काम करीत असलेल्या कलावंतांनीं तयार केलेल्या चित्राचा व शिल्पाचा लिलाव करून जवळ जवळ पंचवीस हजारांचा निधि जमवून तो संरक्षण खात्याला दिला. पंडित रविशंकर यांनीं शंभर गायक-वादक कलावंतांचा एक ' ऑरकेस्ट्रा ' तयार केलेला आहे.

आपल्या ' किन्नर ' या संस्थेतर्फे ते बिर्ला-मातुश्रीं सभागृहांत सादर करून त्याच्या पहिल्या प्रयोगाचें सर्व उत्पन्न त्यांनी राष्ट्रीय-निधीला दिलें.

### स्वर आणि ताल

रविशंकरांनीं निर्माण केलेलें हें वृंद-गायन व वृंद-वादन अप्रतिम आहे. मुंबईत तरी हा प्रयोग नवीन आहे. जाति–गायनापासून पुढें विकसित होत गेलेल्या हिंदुस्थानी संगीताची परंपरा दाखविणारी एक मालिकाच त्यांनीं तयार केलेली आहे. व स्वर आणि ताल यांचा योग्य मेळ घालून आसेतु हिमाचल पसरलेल्या भारतीय संगीताच्या पृथकपृथक पद्धतींचा सुंदर अविष्कार त्यांनी घडविलेला आहे. प्रत्येक संगीतप्रिय माणसानें तो अवश्य पाहिला पाहिजे.

### स्वनामधन्य गायिका

सूरश्री केसरबाई केरकर यांनीहि आपला एक कार्यक्रम संरक्षण निधीसाठीं दिला. त्याबद्दल बाई धन्यवादास पात्र आहेत. बाईचें गाणें दुर्मिळ अशा पद्धतीचें. भावी पिढींत तिच्यासारखी गायिका होईल कीं नाहीं शंका आहे. बुद्धीला चालना देणें आणि मति गुंग करणारें असें तिचें गाणें. गाण्याचा अभ्यास करणाऱ्यानें मिळेल तेव्हां तें ऐकावें आणि मनन करावें. जमल्यास तिचा ' रियाज ' कसा होता हा इतिहास ऐकावा. तो –दैवयोगानें– ऐकायला मिळाला तर आवाज सुधारण्यासाठीं ( व्हॉइस कल्चर ) परदेशांत जायला नको. इथेंच राहून तो सुधारता येईल. धन्य ते गुरु आणि धन्य ती केसरबाईसारखी त्यांची शिष्या...

### अभिजात चित्रदर्शन

जहाँगीर आर्ट ग्यॅलरीमध्यें जीं चित्र प्रदर्शनें भरतात त्या प्रदर्शनाच्या चालकांनीहि आपल्या प्रदर्शनांतील एक उत्तम अशी कलाकृती निवडून ती मध्यभागीं लावून तिची जास्तींत जास्त येणारी रक्कम संरक्षण निधीला अर्पण करण्याची प्रथा पाडलेली आहे. गेल्या पंधरवड्यांत एकाच वेळीं तिथें तीन प्रदर्शनें होतीं. त्यांपैकी श्री. प्र. ग. सिरूर व श्री. ईश्वरदास यांच्या अभिजात पद्धतीच्या चित्रकलेनें थोडेसें लक्ष वेधून घेतलें. सिरूरांच्या रंगसंगतींतील थोडा चांगलेपणा सोडला तर प्रमाणबध्दतेच्या बाबतीत ते अगदींच लुळे पडले होत. त्याची निसर्गचित्रें छायाचित्रांवरून केल्यासारखीं वाटलीं. त्यांतील एकाहि चित्रांत चमक नव्हती. उलट श्री. ईश्वरदास यांच्या 'मिनिथेचर' पध्दतीनें केलेल्या चित्रांत बुध्दिवैभव दिसलें. कृष्णायन, रामायण, कालिदसांच्या मेघदूत काव्यावरील चित्रें इत्यादि चित्रण फार चागलें आणि विचारपूर्वक केलेलें दिसलें. त्यांच्या सीतेचें अग्निदिव्य या चित्राची पार्श्वभूमि आणि त्याची प्रतिकात्मक मांडणी उत्कृष्ट वाटली. यक्षांच्या संदेशाचें चित्रहि मनोज्ञ वाटलें. श्री. हरकृष्णलाल ह्याची गोव्यावरचीं कांहीं चित्रें गोव्यांतला गोवेपणा दाखविणारीं वाटलीं नाही. गोव्याचे वैशिष्ट्य म्हणज लाल रंग. तो आत्मा कुठेहि दिसला नाहीं. माडणींतही माटीशी चमक नव्हती.

### राखी आणि निळारंग

कुमारी प्रफुल्ला जोशी यांचेंहि एक प्रदर्शन येथील ताजमहाल हॉटेलमध्यें भरलेलें होतें. आपल्या चित्रकलेवर त्यांनी फार उत्तम संस्कार करून घेतलेले आढळलं. रंगाची लयबद्धता, आषयाची घनता आणि प्रतिकात्मक मांडणी या गोष्टीमुळें त्यांचें प्रत्येक चित्र वैशिष्ट्यपूर्ण झालें होतें. राखी आणि काळ्या तथा रेशमी आणि गडद निळा यांची मिश्रणें सहजसुंदर झालीं होतीं. प्रफुल्लाबाईची बरींच चित्रें विकलीं गेलीं हें यश थोडें थोडकें नाहीं. प्रेक्षकाल खेंचून घेण्याचें सामर्थ्य त्यांच्या चित्रांत नक्की होतें.

हें मासिक संपादक, मुद्रक, मालक व प्रकाशक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रकाशित केलें.






REGD. NO. B-7640

DECEMBER 1962

DIPAVALI MONTHLY

राष्ट्राची सेवा
धूम्रपानाचा आनंद
सर्वांचें समाधान

गेल्या तीन तपांच्या वर **उंट** आणि **कोंबडा** छाप विड्यांनीं आपल्या देशांतील लक्षावधी लोकांना धूम्र-पानाचा आनंद, तरतरी आणि मनसोक्त समाधान दिलें आहे. आज आमच्या कारखान्यांत एका कोटींच्या वर विड्या सुमारें २५,००० हातांनी दररोज वळल्या जात आहेत. या विड्यांसाठी अगदीं निवडक तंबाकू, उत्कृष्ट पानें आणि तींहि निवडून, वापरण्यांत येत असून त्या, धूम्रपानाचा एक आगळाच आनंद आणि समाधान भावि काळांतहि लक्षावधी लोकांना मिळत राहील.




**बस्तीराम नारायणदास महेश्री आणि चांडक ब्रदर्स,** सिन्नर (नाशिक)

COVER PRINTED BY SADHANA ART PRINTERS BOMBAY-1